प्रकाशिका –

सौ. सरोज मधुसूदन देसाई
" स्वानंद " टिळक आळी नाका,
रत्नागिरी. ४१५६१२



श्री. म. वा. देसाई
बी. कॉम्., बी. ए.,
जी. डी. सी. ॲण्ड ए.
" स्वानंद " टिळक आळी नाका,
रत्नागिरी. ४१५६१२

मुखपृष्ठ –

लक्ष्मी प्रोसेस स्टुडिओ
कोल्हापूर.

मुद्रक –

श्री. श्रीकांत य. जोशी
श्री ज्ञानेश्वर मुद्रण मंदिर, रत्नागिरी.

मूल्य ४ रुपये



सौ. अन्नपूर्णाबाई वामले

गणपतीपुळें येथील शेंड्येशास्त्री यांच्या घराण्यातून
आलेल्या सनातनी व धार्मिक वृत्तीच्या असूनहि माझ्या
जातिभेद निर्मूलनाच्या कार्यात अंगी सहनशीलवृत्ती
बाळगून सहकार्य दिले त्या माझ्या पत्नीस
हे पुस्तक सादर अर्पण

# स्वानुभवाचे लेख

स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या रत्नागिरीतील आठवणी सांगणारे श्री. मो. वि. दामले गुरुजी यांचे हे पुस्तक माहितीपूर्ण आहे. मीहि सावरकर चरित्रातील रत्नागिरी पर्व लिहिले आहे. त्याचा आधार आहे वृत्तपत्रांची कात्रणे, पत्रे, इतरांच्या आठवणी! पण या पुस्तकात श्री. दामले यांनी जे जे स्वतः पाहिले, अनुभवले ते ते आठवणीने लिहिले आहे. हे पुस्तक "स्वानुभवाचे" आहे. त्यांनी आठवणी सोप्या, सहज भाषेत थोडक्यात सांगितल्या असून त्यांची भाषा प्रवाही नि प्रभावी आहे. हे पुस्तक प्रत्येकाने वाचावे. त्यातील आठवणी इतरांना सांगाव्यात आणि सावरकर विचारांचा प्रसार करावा ही सदिच्छा, ही विनंती.

बाळ सावरकर
संचालक
वीर सावरकर प्रकाशन
७१, शिवाजी उद्यान
मुंबई ४०००२८

शिरगांव-रत्नागिरी
१४ फेब्रु. १९८१



# प्रकाशिकेचे दोन शब्द

स्वातंत्र्यवीर तात्याराव सावरकर ! एक असामान्य बुद्धीचे, आंतरराष्ट्रीय कीर्तीचे व्यक्तिमत्व असा आज आपण त्यांचा उदो उदो करतो... पण ५० वर्षांपूर्वी !! त्या काळात तात्या म्हणजे समाजातील एक विक्षिप्त माणूस! हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी निर्भयपणे अहोरात्र झटणारा सरकारच्या काळ्या यादीतील अग्रणी-आणि म्हणून त्यांच्याशी दुरान्वयाने सुद्धा ज्यांचा संबंध आला ते इंग्रज सरकारच्या रोषाचे बळी!··· तत्कालिन उच्चभ्रू लोकांच्या टीकेचे निंदेचे लक्ष्य!! अशा वेळी तात्यांना आमच्या घरात राहायला दिल्याने तात्यांच्या चरणस्पर्शाने जसे आमचे घर पुनीत झाल्याचे वाटते तितकाच अभिमान त्यांना त्यावेळी घरात राहायला जागा देणाऱ्या माझ्या आजोबांच्या ( कै. ती. विष्णुपंत दामले) धैर्याचा, दूरदृष्टीचा व स्वधर्मप्रेमाचा वाटतो!!

स्वा. सावरकरांच्या वास्तव्यामुळे आमच्या ती. नानांना (श्री. मो. वि. दामले) त्यांचा सुमारे १४ वर्षे सहवास लाभला. त्यावेळी त्या काळात तात्यांनी सामाजिक कार्याला वाहून घेतल्यामुळे त्यांच्या दैनंदिन व्यवहारात त्याबाबत घडणाऱ्या घटना आमच्या नानांनी लिहिल्या व त्या केसरीचे माजी संपादक मा. जयंतराव टिळक यांनी सन १९७२ मध्ये "केसरी" वर्तमान पत्रात क्रमशः लेखात प्रसिद्ध केल्या. सदर घटना ह्या घरगुती स्वरूपाच्या किंवा नेहमीच्या वागणुकीतील आहेत. त्या पुस्तकरूपाने मी एकत्र करण्यात ही मा. बाळाराव सावरकर यांची प्रेरणा! लहानपणी आम्ही जसे या गोष्टींनी रंगत होतो तसे पुढील पीढीला ही संधी मिळावी या सदिच्छेने ही धडपड!!

सौ. सरोज देसाई



**स्वा. सावरकरांच्या प्रेरणेने स्थापन झालेले**
**सर्व हिंदूना खुले असलेले रत्नागिरी येथील**
**श्री पतितपावन मंदिर**

# लेखकाचे हृद्गत

स्वा. सावरकरांना १९२४ ते १९३७ पर्यंत त्यावेळच्या ब्रिटीश सरकारने रत्नागिरी येथे स्थानबद्ध करून ठेवले होते. त्या मुदतीत १९२४ मध्ये रत्नागिरी येथे प्लेगची साथ आल्यामुळे ते १९२४ च्या नोव्हेंबर मध्ये शिरगांवला आमच्या घरी रहायला आले. सुमारे ६ महिने ते आमच्या घरी ज्या खोलीत राहात होते ती खोली पहायला अद्याप बरेच जण येऊन चौकशी करतात. सावरकरांच्या त्यावेळच्या आठवणी अनेक लोकांना सांगत असताना त्या लिहून प्रसिद्ध करण्याची त्यांची सूचना हीच या पुस्तिकेची मूळ प्रेरणा ! या स्मृति १९७२ मध्ये केसरीच्या अंकात क्रमश: प्रसिद्ध केल्या होत्या. त्यामध्ये काही बदल करून, तर काही नवीन भर घालून या आठवणी ' सावरकर शताब्दि ' वर्षात पुस्तक रूपाने प्रसिद्ध होत आहेत. हे औचित्यपूर्ण आहे.

माझे जावई श्री. मधुसूदनराव देसाई यांचा सततचा आग्रह नि प्रयत्न यामुळेच ही पुस्तिका प्रसिद्ध होत आहे. त्यांचा माझ्यामागे सतत ससेमिरा नसता तर या ' स्मृति ' प्रसिद्ध झाल्याच असत्या असे सांगता येत नाही. म्हणून काहीसा औचित्यभंगाचा दोष पत्करूनहि प्रथम मला त्यांचे आभार मानावयास हवेत, नव्हे ते माझे कर्तव्य आहे.

महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध चरित्रकार पद्मभूषण डॉ. धनंजयराव कीर यांनी त्यांची प्रकृति बरी नसतानाही केवळ माझ्यावरील प्रेमामुळे या पुस्तकाला प्रस्तावना लिहून दिली. स्वा. सावरकरांच्या वाङ्मयाचा चिकित्सा पूर्ण अभ्यास असणाऱ्या श्री. बाळाराव सावरकर यांनी नि महाराष्ट्राच्या सुप्रसिद्ध कादंबरीकार आमदार सौ. कुसुमताई अभ्यंकर यांनी या पुस्तिकेला अभिप्राय दिले याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

पुस्तक छपाईचे काम सुबकरीत्या व आत्मीयतेने केल्याबद्दल ज्ञानेश्वर मुद्रण मंदिरचे श्री. श्रीकांत जोशी यांचे आभार मानणे माझे कर्तव्य समजतो.

माझी सर्वात लहान मुलगी चि. कमल ( सध्या सौ. सरोज देसाई ) हिने ही पुस्तिका प्रकाशित करण्याची जबाबदारी घेऊन मला उपकृत केले.

सावरकरांनी त्याकाळी जे समाजप्रबोधनाचे काम केले त्याची कल्पना नसणाऱ्यांना या स्मृति वाचल्यावर सावरकरांच्या त्यावेळच्या कामाची काहींशी कल्पना यावी या सद्हेतूने ही धडपड !

**मो. वि. दामले**

# प्रास्ताविक

वीर सावरकर अंदमान, रत्नागिरी व येरवडा येथील तुरुंगातून ६ जानेवारी १९२४ रोजी सुटल्यावर त्यांना रत्नागिरीस पाठविण्यात आले. पण रत्नागिरीत प्लेगचा प्रसार झालेला असल्यामुळे रत्नागिरी जवळच्या शिरगाव या गावी श्री. विष्णुपंत दामले यांच्या घरातील १२ फूट लांब व ७ फूट रुंद अशा एका खोलीत सावरकरांचे वास्तव्य सुरु झाले.

शिरगावात असतांना सावरकरांचा दिनक्रम आकर्षक होता तोहि लेखकाने गोड भाषेत दिला आहे. सावरकर सकाळी सातच्या सुमारास उठत. शौचमुखमार्जन झाल्यावर सुमारे २०-२५ मिनिटें डंबेल्सच्या सहाय्याने व्यायाम करीत. ते एक दिवसा आड स्वतःच दाढी करीत. काळे लांब ठेवीत पण मिशी काढीत नसत. पांढरे शुभ्र धोतर, साध्या कॉलरचा पांढरा शुभ्र शर्ट व त्यावर पांढऱ्या रंगाचा कोट, डोक्यावर बाटोळी काळ्या रंगाची टोपी, घरीत मात्र ते लोकरीचा कोट घालीत असत. बाहेर जाते वेळी ते कोटाला व शर्टला हीना अत्तर लावीत असत.

समाजाला सारखे धक्के देत राहाणे हा सावरकरांचा स्वभाव विशेष होता. सार्वजनिक हळदीकुंकू समारंभ करण्यास त्यांनी शिरगांवात प्रारंभ केला.

१९२५ मधील फेब्रुवारी मार्च मध्ये डॉ. हेगडेवार यांनी सावरकरांची शिरगाव येथे भेट घेतली व त्यांनी सावरकरांबरोबर रत्नागिरीस जाऊन चर्चा केली. अस्पृश्यता निवारण, धर्मांतर्बंध यांची चर्चा करणाऱ्या सावरकरांनी हेगडेवारांना काय सांगितले असेल याची कल्पना करता येईल. ग्रंथकार श्री. वि. दामले यांनी डॉ. हेगडेवार यांचे छोटेसे मनोहर शब्दचित्र रेखाटले आहे ते वाचनीय आहे. पतीतपावन देवळाची स्थापना कशी झाली हे सांगणारा भागोजीशेट कीर व वीर सावरकर यांच्या मधील दिलेला संवाद सुबोध आहे.

सामाजिक समतेसाठी सहभोजनाचा उपक्रम सावरकरांनी सुरू केला. "पॅन हिंदु" या इंग्रजी शब्दाला "अखिल हिंदु" हा मराठी प्रतिशब्द सावरकरांनी प्रथम योजिला. या सहभोजनाचे अन्नाला प्रथम भिकारी सुद्धा शिवत नसत. पण डॉक्टर, वकील, श्रीमंत लोक सहभोजनात भाग घेऊ लागताच तेहि त्यात भाग घेऊ लागले. भाषाशुद्धीची चळवळ सावरकरांनी सुरू केल्यानंतर तारखेला "दिनांक" व सिनेमाला "बोलपट" म्हणणाऱ्या सावरकरांना त्यावेळी दोष देणाऱ्या अनेक लोकांनी स्वतःच "दिनांक" व "बोलपट" हे शब्द सुरू केले. विरोधक पुजारी बनले. माधव ज्युलियन यांच्यावर या चळवळीचा इतका परिणाम झाला की त्यांनी आपली संपूर्ण कविता पुढे शुद्ध मराठीत लिहिली.

सावरकर व भागोजीशेट कीर यांनी प्रखर विरोधाला न जुमानता सुधारण्याचा आग्रही पुरस्कार सतत आयुष्यभर केला.

सावरकरांनी रत्नागिरीत समाजक्रांतीला पूरक असे एक "अखिल हिंदु उपाहारगृह" सुरू केले. त्या उपाहारगृहाचे संचालक श्री. गजाननराव दामले होते. तेथे चहा, चिवडा महाराचा हातचा मिळे. तेथेच सावरकरांचे पाहुणे त्यांना भेटायला येत.

सावरकरांचे रत्नागिरीतील कार्य पाहून कर्मवीर शिंदे म्हणाले, "तुम्ही हजारो भंगी महारप्रभृती धर्मबंधुबरोबर सहपूजन, सहभोजनादि प्रकटपणे करता. हे दिवस मी पहाण्यास जगलो हे ठीक झाले. स्वातंत्र्यवीराने आपल्या अज्ञातवासाच्या अवघ्या सात वर्षांत ही अपूर्व सामाजिक क्रांती घडवून आणली. देवाने माझे उरलेले आयुष्य त्यांसच द्यावे."

श्री. मोरेश्वर दामले यांनी या आठवणी उत्स्फूर्तपणे पण विनयशीलतेने लिहिलेल्या आहेत. त्यातल्या काही आठवणी हृद्य आहेत. भाषेचा त्यात फुलोरा नाही पण भावनांचा ओलावा आहे व सत्य घटनांचा इतिहास सुसंगतपणे मांडण्याचा त्यांचा प्रयत्न प्रशंसनीय आहे. यातून सावरकर मूर्तिमंत वाचकांपुढे साकार होतात. ते कसे बोलत, कसे वागत, कसे चालत, आपले विचार एखाद्याच्या कसे गळी उतरवीत आणि त्यांच्या बोलण्याची लकबहि यात दिसून येते. हा एक छोटासा ग्रंथ आहे. परंतु त्यात सावरकरांच्या जीवनाचा काही भाग हुबेहूब वठला आहे हे पहिल्या प्रकरणातसुद्धा दिसून येईल.

श्री. मोरेश्वर दामले यांनी आपल्या छोटयाशा पण आकर्षक हृद्य आठवणी लिहिलेले हे छोटेसे पुस्तक परिणामकारक ठरेल अशी मला आशा आहे.

माहीम
मुंबई १६

**डॉ. धनंजय कीर**

**सौ. कुसुमताई अभ्यंकर**
अेम् अे.
विधान सभा सदस्य
आमदार निवास मुंबई नं. १

' शिव दर्शन '
शिर्केवाडी, शिवाजी नगर
रत्नागिरी. ☎ २६२४

मा. दामले गुरुजी यांनी लिहिलेल्या देशभक्त आणि समाजक्रांतिकारक कै. स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या आठवणी वाचल्या आणि अतीशय आवडल्या. या थोर देशभक्ताच्या सान्निध्यात रहाण्याचे भाग्य श्री. दामले यांना लाभले याबद्दलचा त्यांच्या मनात असलेला अभिमान शब्दाशब्दातून ओसंडतांना आढळतो म्हणूनच या आठवणी कोरड्या वाटत नाहीत तर जिवंत वाटतात. आपुलकीने प्रेमाने आणि अभिमानाने भरलेल्या वाटतात.

या आठवणी वाचल्यानंतर अल्पावधीत स्वातंत्र्यवीर सावरकरांनी रत्नागिरीत जी आमूलाग्र क्रांती घडवून आणली तिचं दर्शन घडतं आणि मन आश्चर्यानं थक्क होऊन जातं. जातिभेद निर्मूलनाचं कार्य शासकीय पातळीवरून नंतर झालं, अनेक पुढाऱ्यांनी आणि विचारवंतांनीही त्यात पुढाकार घेतला परंतु या कार्याची मुहूर्तमेढ स्वातंत्र्यवीरांनी रत्नागिरीत रोवली आणि भारतातलं सर्व जातीच्या बंधिवांना मुक्त प्रवेश देणारं पहिलं देऊळ पतितपावन मंदिर आमच्या रत्नागिरीत आहे याचाही अभिमान वाटतो.

स्वातंत्र्यवीरांचं वास्तव्य श्री. दामले यांच्या घरात होतं त्यामुळे त्यांच्या बारीकसारीक आठवणी श्री. दामले यांनी अतिशय प्रभावीरीतीनं वाचकांपुढे ठेवल्या आहेत. साक्षरता प्रचार, चहासाठी कुटुंबातल्या मंडळींची अडणारी तारांबळ, श्री. दामले यांनी केलेली शिवाजी महाराजांची भूमिका, स्त्रियांचे सहभोजन, अखिल हिंदु अुपहारगृह, जातिभेद पुतळ्याचे दहन अशा अनेक आठवणी वाचता वाचता हृदय हेलावून जातं आणि त्या काळाचं अेक चित्र डोळ्यासमोर अुभं रहात. रत्नागिरीतील तरुण पिढीला स्वा. सावरकरांनी केलेल्या महान कार्याची ओळख होण्याच्या दृष्टीने या आठवणी अतिशय अुपयुक्त आहेत. श्री. दामले यांनी लिहिलेल्या आठवणी वाचून क्षणभर विचार मनात आला ईश्वरान मला त्या काळात रत्नागिरीत कां बरं जन्माला घातलं नाही. म्हणजे या सर्व अपूर्व घटना मलाही बघता आल्या असत्या!

श्री. दामले यांना मनःपूर्वक धन्यवाद!

**सौ. कुसुम रा. अभ्यंकर**
आमदार रत्नागिरी,



हेच ते शिरगांव येथील हनुमान मंदिर की जिथे स्पृश्य-अस्पृश्यांची एकत्रित खिचडी पहिल्या प्रथम शिजली.



आमच्या घरात सावरकरांचे वास्तव्य असलेली ही खोली

# राज्यक्रांतीकाराने समाजक्रांतीचे कार्य हाती घेतले

## तात्यांचा दामले घराण्याशी संबंध

तेवीस डिसेंबर १९१० रोजी सावरकरांना २५ वर्षांची व ३० जानेवारी १९११ ला दुसरी २५ वर्षांची अशा दोन जन्मठेपीच्या शिक्षा झाल्या. परंतु जनतेच्या सततच्या आग्रहाच्या मागणीवरून दिनांक ६ जानेवारी १९२४ रोजी त्यांची कारागारातून सुटका झाली. सुटका होतांना त्यांच्यावर दोन अटी लादण्यात आल्या होत्या. त्यांनी राजकारणात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष भाग घ्यावयाचा नाही ही पहिली व रत्नागिरी जिल्हा सोडून सरकारच्या पूर्वपरवानगीशिवाय बाहेर कोठे जावयाचे नाही ही दुसरी. "At Ratnagiri, he will have predecessor of a very different stamp. After the third Burmese war, king Thibaw was exiled to Ratnagiri and it was there that he died." सावरकरांच्या मुक्ततेच्या वेळी 'टाइम्स ऑफ इंडिया' ने वरील अशुभ सूचक कुत्सित उद्गार काढल्याचे अनेकांच्या अद्यापि स्मरणात असेल.

अशा रीतीने ६ जानेवारी १९२४ पासून १७ जून १९३७ पर्यंत स्वातंत्र्यवीर सावरकरांचे रत्नागिरीत वास्तव्य होते. या तेरा वर्षांच्या काळात त्यांनी रत्नागिरी जिल्ह्यात भाषणें, लेखन व आंदोलने यांनी हिंदुसंघटन व शुद्धि या समाजकार्याबाबत केवढी धमाल उडवून दिली होती याची कल्पना आजच्या तरुणांना फारशी नाही.

सुदैवाने अशा या महान देशभक्ताचा आमच्या घराण्याशी निकटचा संबंध आला. त्याचे असे झाले की, १९२४ व २५ या साली रत्नागिरीला प्लेगचा प्रादुर्भाव झाला. तेव्हा जून २४ मध्ये सावरकरांना नाशिकला जायची परवानगी मिळाली. ही ३ महिन्यापुरती होती. पुढे आणखी १-२ महिने वाढली पण त्यानंतर रत्नागिरीत प्लेग चालूच होता तरीही त्यांनी रत्नागिरीत परत फिरावे असा सरकारी आदेश झाल्याने ते नोव्हेंबर १९२४ मध्ये परत रत्नागिरीत आले.

पण रत्नागिरीमध्ये प्लेग चालूच असल्याने त्यांनी जवळच्या शिरगाव गावी स्थलांतर करण्याचे ठरविले. नोव्हेंबर १९२४ मधील ही घटना असावी. आपल्यावर सरकारची अवकृपा होईल या भीतीने त्यांना राहण्यास जागा देण्यास कोणी तयार होईना. या स्थितीत आमचे वडील कै. दादा (कै. विष्णुपंत दामले) यांनी त्यांना आपल्या घरी आमंत्रण दिले. आमचे घर जुने, सोयी फारशा नाहीत, सावरकरांसारख्या थोर देशभक्ताला त्यांत वास्तव्य करणे कितपत योग्य होईल ही शंका होतीच. तथापि सावरकरांनी घर पाहिले व येण्याचे ठरविले.

सावरकर त्या वेळी एकटेच आले होते. गर्भवती असल्याने त्यांनी आपल्या पत्नीला सासऱ्याला ठेवले होते. आमच्या घरी आल्यावर त्यांनी रहाण्यास जी खोली पसंत केली ती सुमारे बारा फूट लांब आणि सात फूट रुंद होती. मूळ आमचे ते भाताचे कोठार होते. त्यात प्रकाश फारसा नव्हता. फक्त एक दार आणि एक लहानशी खिडकी होती. म्हणून आमच्या वडिलांनी त्यांना विचारले "तात्यासाहेब, ही एवढीशी लहान खोली तुम्हाला पुरेल का ? तिला ना धड दरवाजा, ना धड खिडकी ! प्रकाशही पुरेसा नाही." त्यावर तात्या उत्तरले "विष्णुपंत, आधी पहिली गोष्ट म्हणजे मी तात्यासाहेब नाही. तुम्हाला नुसते तात्या म्हणणे कसेसेच वाटत असेल तर 'तात्याराव' म्हणा. आणि या खोलीबद्दल म्हणत असाल तर अंदमानात याहीपेक्षा लहान, अस्वच्छ आणि काळोख्या खोलीत रहात होतो. तेव्हा अशा खोलीत राहण्याची मला सवय आहे. तुरुंगाची ओळख एवढ्यातच विसरणे इष्ट नाही."

पुढे सावरकरांनी याच खोलीत जमिनीवर बसून व आपल्या ट्रंकेचे 'डेस्क' करून 'हिंदुपदपादशाही' हा आपला इंग्रजी ग्रंथ लिहिला. अंदमानच्या अंधाऱ्या कोठडीत त्यांनी मौलिक ग्रंथलेखन कसे केले असेल त्याची यायोगे आम्हांला अंधुक कल्पना आली. अद्यापहि सावरकरांच्या वास्तव्याने पुनीत झालेली ही खोली एक ऐतिहासिक महत्वाची वास्तु म्हणून आम्ही आमच्या घरात जशीच्या तशी ठेवली आहे.

## तुम्ही आम्ही सकल हिंदु बंधु बंधु

सावरकर शिरगावास येऊन महिना दीड महिना झाला असेल तोच श्रीहनुमान जयंतीचा उत्सव आला. गावातील कै. महादेव गुरव यांनी हनुमानाची एक लहानशी घुमटी बांधून पूर्ण केली होती तिचा पहिलाच उत्सव होता. इतर ग्रामस्थांबरोबर त्याने सावरकरांनाहि आमंत्रण दिले. सावरकर त्यावर म्हणाले, 'मी उत्सवाला येईन, पण एका अटीवर आणि ती ही की माझ्याप्रमाणेच



गावातील महार-चांभार वगैरे मंडळींना, ज्यांना तुम्ही अस्पृश्य समजता त्यांना, आमंत्रण दिले गेले पाहिजे.'

गुरव प्रथम आढेवेढे घेऊ लागले. तेव्हा सावरकरांनी आपल्या देवमूर्तींना दगड मानणाऱ्या परधर्मीयांनाहि आपण आपल्या घरात घेतो, उत्सवप्रसंगी त्यांची वाद्ये लावतो, पण आपल्या देवतांनाच भजणारे आपले धर्मबांधव जे महार-चांभार वगैरे अस्पृश्य लोक त्यांना मात्र शिवतहि नाही हा मोठा अन्याय आहे. आदि गोष्टी समजावून सांगितल्या तेव्हा मोठ्या मिनतवारीने गुरव यांनी अस्पृश्यांना उत्सवाचे आमंत्रण देण्याचे मान्य केले. सुमारे अर्धा तासपर्यंत सावरकर त्यांच्याशी युक्तिवाद करीत होते.

गुरव गेल्यावर मी सावरकरांना म्हटले, "तात्या, या क्षुल्लक मनुष्या-बरोबर इतक्या दीर्घकाळ कशाला चर्चा केलीत ?"

सावरकरांनी उत्तर दिले, "शेकडो लेख किंवा व्याख्याने यापेक्षा प्रत्यक्ष केलेल्या कार्याचाच जास्त परिणाम होत असतो. आता हनुमान जयंतीच्या दिवशी तू पाहशीलच."

त्याच रात्री सावरकरांनी एक फुटकी दगडी पाटी व बारीकशी दगडी पेन्सिल घेऊन त्यावर 'तुम्ही आम्ही सकल हिंदु बंधु बंधु' या एकता गीताची रचना केली. दुसऱ्या दिवशी तालसुरावर ते मजकडून बसवून घेतले व हनुमान जयंतीच्या दिवशी सभेत पेटीतबल्याच्या साथीत मी ते प्रथम म्हटले.

हनुमान जयंतीचा उत्सव आला. दिंडी निघण्यापूर्वी 'हिंदूचे एकतागीत' झाल्यावर सावरकरांचे व्याख्यान झाले. व्याख्यानाच्या आरंभी अस्पृश्य एका बाजूला बसले होते. आपल्याच हिंदु समाजाचा एक भाग असा विलग पाहून सावरकरांचे अंतःकरण व्यथित झाले होते. त्या पार्श्वभूमीवर त्यांनी अस्पृश्यता पाळणे हे किती अमानुष व अन्याय्य आहे, त्यामुळे आपल्या समाजाची कशी हानी होत आहे इत्यादि गोष्टी आपल्या अमोघ व अस्खलित वक्तृत्वाने श्रोत्यांना पटवून दिल्या व त्यांच्या नित्याच्या पद्धतीप्रमाणे व्याख्यानाच्या शेवटी श्रोते आपल्या भावनाने भारावलेले दिसून येताच प्रश्न टाकला, 'तर मग सांगा की, आपल्या या दूर बसलेल्या अस्पृश्य बांधवांना आपल्या बरोबर घेऊन सरमिसळ दिंडी काढणार ना ?" आणि काय आश्चर्य ! बहुतेक सर्व श्रोत्यांनी, विशेषतः तरुणांनी, त्या मंत्रमुग्धावस्थेत 'होय, काढणार' असा प्रतिसाद दिला आणि त्या दिवशीची दिंडी सरमिसळ निघाली.

सुमारे ५० वर्षांपूर्वीच्या त्या काळात कोकणात सर्वत्र अस्पृश्यांची सावलीही सवर्ण हिंदु घेत नसत, मग त्यांना स्पर्श करणे दूरच ! कोठे बाहेर जाऊन

आले तरीहि कपडे बदलून मग घरात जावयाचे हा सर्वत्र रिवाज, अशा त्या काळात या सरमिसळ दिंडीने गावातील लोकात विलक्षण खळबळ उडवून दिली असल्यास नवल नाही.

## पहिले संमिश्र हळदीकुंकू

समाजाला सारखे धक्के देत रहाणे हा सावरकरांचा स्वभावविशेष होता. त्या हनुमानजयंतीच्या उत्सवानंतर थोड्याच दिवसांनी सावरकरांनी आमच्या घरात अखिल हिंदु स्त्रियांचे हळदी-कुंकू करावे असा आग्रह धरला. सवर्ण आणि त्यातही ब्राह्मणाच्या घरी अस्पृश्य स्त्रियांना हळदी-कुंकवाला बोलवावयाचे व स्वहस्ते त्यांना हळदी-कुंकू देऊन त्यांची ओटी भरावयाची ही गोष्ट त्या काळात पटणे कठीण होते. आमच्या घरातील स्त्रिया या गोष्टीला कबूल होईनात. अस्पृश्य स्त्रियांना हळदी-कुंकवाला आमंत्रणास कोणी सिद्ध होईना. शेवटी सावरकरांनी आमच्या घरातील स्त्रियांशी तडजोड केली. आम्ही अस्पृश्य स्त्रियांना फक्त निमंत्रण द्यावे. त्यांच्या ओट्या भरणे, त्यांना हळदी-कुंकू देणे हे कार्य माई (सावरकरांच्या पत्नी) करतील. या तडजोडीप्रमाणे आमच्या गावातच काय पण सर्व जिल्ह्यामध्ये कित्येक महिने गाजलेला हळदी कुंकवाचा समारंभ पार पडला. अस्पृश्यांना स्पर्श करून त्यांच्या ओट्या भरणारी ही बाई आहे तरी कोण हे पाहण्यासाठी स्त्रियांची खूप गर्दी आमच्याकडे झाली होती आणि सौ. माई अस्पृश्य स्त्रियांच्या ओट्या भरीत होत्या त्या वेळी जणू काय एखादी अद्भुत गोष्ट आपण पहात आहो या दृष्टीने सर्वच स्त्रिया त्यांच्याकडे पहात होत्या. स्थानिक वर्तमानपत्रातून ठळकपणे हा हळदीकुंकू समारंभ छापला गेल्याने सर्व जिल्ह्यामध्ये या एका लहानशा घटनेने मोठी खळबळ उडवून दिली. सर्वत्र अस्पृश्योद्धाराबद्दल अनुकूल-प्रतिकूल चर्चा होऊ लागली. शिरगावच्या या लहानशा हळदी-कुंकवानेच प्रथमतः रत्नागिरी जिल्ह्यातील हिंदु समाजाला अस्पृश्यतेच्या रूढीविषयी चिकित्सापूर्ण दृष्टीने विचार करणे भाग पाडले.

## तात्यांचें हस्ताक्षर

शिरगाव–रत्नागिरीत ही आंदोलने चालू होती तेव्हा मी १६ वर्षांचा होतो व इंग्रजी ६ वीत ( हल्लीची १० वी ) शिकत होतो. सावरकर स्फुट लिखाण करीत. त्यांच्या प्रती करणे, त्या निरनिराळ्या वर्तमानपत्रांकडे रवाना करणें इत्यादि कामे ते शिरगावात होते तोपर्यंत माझ्याकडे असत. सावरकरांच्या लिखाणाच्या प्रती करणे हे त्यांच्या इतर गोष्टींप्रमाणे इतरांना-निदान मला तरी मोठे दिव्य वाटे. त्यांचे हस्ताक्षर अत्यंत वाईट असे. त्यातच काकपदे असलेली अनेक स्थळें. त्यामुळे त्यांचे कोणतेहि लिखाण मी त्यांच्याकडून प्रथम वाचून घेई व नंतरच प्रती करण्याच्या कामाला सुरवात करीत असे. इतके असूनहि प्रती



करतांना अडचणी येतच. एकदा तर मी थोडेसे रागावून व काहीशा विनोदाने त्यांना विचारले की, "तात्या, तुमचे हे असले दिव्य अक्षर परीक्षक वाचीत कसे आणि तुम्हाला उत्तीर्ण करीत कसे ?" सावरकर यावर विनोदाने मला म्हणाले 'अरे! अजून तुला ही गोष्ट माहीत नाही का की, अक्षर आणि बुद्धि यांचे नेहमीच व्यस्त प्रमाण असते. जितके अक्षर वाईट तितकी बुद्धि तीक्ष्ण. माझे अक्षर वाईट आहे म्हणूनच बुद्धि तीक्ष्ण आहे बर का ! "

## साक्षरता प्रचार

लहान असो वा मोठे असो काही तरी प्रत्यक्ष कार्य करावे अशी त्यांची शिकवण असे. काही भव्य दिव्य करण्याची कुवत नसेल तर 'अकरणान्मंदकरणं श्रेयः' या सुभाषितानुसार जी लहानसहान कामे करता येण्यासारखी आहेत ती तरी सर्वांनी आपल्या कुवतीप्रमाणे करावीत अशी त्यांची शिकवण असे. म्हणून त्यांनी मी आणि माझ्यासारखे चौघेजण यांच्याकडे एक दिसण्यात लहानसे पण मूलगामी असे काम त्यावेळी सोपविले होते. आम्हा सर्वांकडे त्या वेळी कुणबी जातीचे चार-पांच गडी नोकर असत. सावरकरांनी आम्हां पांच जणांकडे त्यांना साक्षर करण्याचे काम दिले. आमचे हे वर्ग सुमारे दोन महिने चालले होते. बिचारे कुणबी नोकर! दिवसभर शारीरिक कष्टाचे काम करून थकून जावयाचे आणि रात्रीचे जेवण झाल्यावर त्यांना आणि काही वेळा आम्हा शिक्षकानाहि झोप येऊ लागावयाची. कशाला हे नसते काम सावरकरांनी आमच्या पाठीशी लावले असे अनेकदा आम्हा दोघानाहि-शिक्षक व विद्यार्थी यांना वाटू लागावयाचे. केव्हा केव्हा वैतागहि यावयाचा. अशा प्रत्येक वेळी सावरकर देशभक्तीची कामे करताना ज्यांना काळ्या पाण्याची शिक्षा झाली आहे किंवा ज्यांना कारावासाची शिक्षा झाली आहे अशा कोणत्या ना कोणत्या देशभक्ताची हकीगत सांगत आणि म्हणत 'त्यांना जे हाल सोसावे लागत आहेत, ज्या शारीरिक वा मानसिक यातना सहन कराव्या लागत आहेत त्या मानाने तुमचे हे कष्ट काहीच नव्हेत. मग देशासाठी एवढे लहानसे कष्टहि तुम्ही घेणार नाही का ?" सावरकर एवढे बोलले की आमची आम्हाला लाज वाटे व आम्ही उभयता-शिक्षक व विद्यार्थी आपापल्या कामाला लागत असू.

अशा परिस्थितीत सुमारे दोन महिन्यांमध्ये मी माझ्या शिष्यांना त्यांचे स्वतःचे नांव लिहिण्यास व सर्व मराठी मुळाक्षरे लिहिण्यास शिकविले. मुळाक्षरांवर आधारित असे फणस, पपनस, कमळ इत्यादि शब्द लिहिता येऊ लागले, त्या वेळी त्यांना केवढा आनंद झाला हे अद्यापीहि मी विसरलेला नाही. शेवटी सावरकरांनी या विद्यार्थ्यांची परीक्षा घेऊन ते पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाल्याचे मान्य केले तेव्हा आम्हाला अस्मान दोन बोटे ठेंगणे वाटले.

आज ही आठवण लिहिल्यावर माझ्या त्या चारहि विद्यार्थ्यांना मी ती वाचून दाखविली आणि त्यांना विचारले, 'आठवते का रे ही गोष्ट आता तुम्हाला ? आणि त्या वेळी मी शिकविल्यापैकी आज काही उरलंय काय ?' त्यावर त्यांनी उत्तर दिले, 'सही करता येईलसे वाटते, पण चुकेल म्हणून आम्ही आपले आंगठेच घेवतो. बाकी काही विसरलो. काही लक्षांत आहेत. पण हे तुम्ही लिहिलेले जर छापून आले तर आम्हाला वाचून दाखविण्यास मात्र विसरू नका.' या माझ्या चारी विद्यार्थ्यांची नावे आहेत—बंडू भरणकर, बाबू फारकर, भिकू चव्हाण आणि महादेव कारकर आणि त्यांचा पत्ता आहे गायवाडी—शिरगांव.



# भोंगळ पणाला ठाम विरोध

## शिवलेले उपरणे !

सावरकरांच्या हजरजबाबी स्वभावाची व बिनतोड युक्तिवादाची एक गोष्ट नमूद करावीशी वाटते. एके दिवशी खूप थंडी पडली होती. थंडी कितीही असली तरी रात्रीच्या जेवणाला अंगरखा काढून उघड्या अंगाने बसण्याचा कोकणात रिवाज आहे. आम्ही सर्व मुले त्यामुळे अंगरखे काढून जेवावयास बसलो. आमच्या वडिलांनी उपरणे पांघरले होते, पण सावरकर अंगरखा घालून तसेच जेवावयास बसले होते. म्हणून आमचे वडील त्यांना सहज म्हणाले, "सदरा घालून जेवावयास कशाला बसता ?"

त्यावर तात्या आमच्या वडिलांना म्हणाले, "मग तुम्ही हे अंगावर काय घेतले आहे आणि कशासाठी ?"

त्यावर वडील उत्तरले "हे उपरणे ; रूढीप्रमाणे उपरणे घेण्यात हरकत नसते."

त्यावर सावरकरांनी तात्काळ उत्तर दिले, "माझेहि हे उपरणेच आहे, फक्त शिंप्याकडून टाके मारवून ते मी सोयीस्कर करून घेतले आहे इतकेच."

## स्वत्वाशिवाय स्वराज्य ?

तात्या आमच्याकडे असतानाच बेळगावला काँग्रेस अधिवेशन झाले. अधिवेशन आटोपल्यावर अनेक पुढारी मंडळी रत्नागिरीमार्गे परत गेली. रत्नागिरीत आलेल्या या मंडळींपैकी अनेक जण त्यावेळी आमच्या घरी येऊन सावरकरांना भेटून गेल्याचे मला स्मरते. अशीच एकदा सकाळी पांच–सहा मंडळी त्यांना भेटण्यास आली असता त्यांपैकी एकाने 'हिंदुसंघटनाची चळवळ करणारी मंडळी, तुकारामाच्या कोठें आकार घेत असलेल्या हिंदु–मुसलमानांच्या एकीत अडथळा आणीत आहेत.' असा आशयाचे विधान केले. ते गृहस्थ पुढे

म्हणाले, "यामुळे भारतास स्वराज्य देणे पुढे ढकलण्यास ब्रिटिशांना एक चांगली सबब सांपडेल."

हे ऐकताच सावरकर एकदम त्वेषाने म्हणाले, "आपल्या म्हणण्याचा आशय हाच ना की, मी, पंडित मदनमोहन मालवीय, लाला लजपत राय डॉ. मुंजे, स्वामी श्रद्धानंद इत्यादि हिंदु संघटन करणारे लोक स्वराज्य दूर ढकलीत आहेत? महाशय! ज्यावेळी तुमचा जन्महि झाला नसेल त्यावेळी आम्ही स्वराज्यासाठी फाशीच्या फळ्यापर्यंत जाऊन आलो आहोत. ज्याचा सर्व जन्म स्वराज्यासाठी अखंडित हालअपेष्टा आणि कष्ट काढण्यांत गेला आणि जात आहे अशाबद्दल हे उद्गार काढण्यास तुम्हांला कसलीच दिक्कत वाटली नाही हे कोणत्या मनोभावनेचे द्योतक? लक्षांत ठेवा की तिकडे केमालपाशा खिलाफतीची खिजगणत करतो आहे तर आम्ही इकडे 'खिलाफत' डोक्यावर घेऊन नाचत आहों. का तर हिंदु-मुसलमानांच्या एकीसाठी. तबलीगच्या (हिंदूना मुसलमान करून घेण्याची चळवळ) चळवळीविरुद्ध आम्ही हिंदु 'ब' काढत नाही; का तर हिंदु मुसलमानांच्या एकीसाठी! अनेक ठिकाणी मुसलमानांच्या आगळिकीने दंगे होतात, पण आम्ही त्याविरुद्ध आवाज उठवीत नाही. का तर हिंदु-मुसलमानांची एकी बिघडेल म्हणून. आणि 'स्वराज्य स्वराज्य' म्हणजे तरी काय हो? ज्यात स्वत्व राहते तेच स्वराज्य ना? मग ज्यात आपले हिंदूचे स्वत्व रहाणार नसेल ते आमचे स्वराज्य होईल काय? तुमच्यासारख्यांच्या भोंगळ वागणुक आणि कचखाऊ वृत्तीमुळेच मुसलमान शेफारून जातात, बनलेहि आहेत. मुसलमानांना त्यांचे योग्य ते हक्क देऊ नये म्हणून आम्ही कधी तरी म्हटले आहे का? खुशाल त्यांनी भारतात सुखासमाधानाने नांदावे. पण ते जर अद्यापहि आपल्या एका काळाच्या हिंदुस्थानावरील राजकीय वर्चस्वाच्या स्वप्नात दंग असतील व तसेच भविष्यकाळाची स्वप्ने रंगवीत असतील तर ते मात्र आम्ही चालू देणार नाही. नुकताच मी मुंबईस असताना (सावरकर नाशिकहून रत्नागिरीस मुंबईमार्गे गेले होते व त्यावेळी ते मुंबईस डॉ. सावरकर यांच्या घरी २-३ दिवस होते.) मौलाना शौकतअल्लीशी माझे वादावादीचे संभाषण झाले त्यावरून राष्ट्रवादी मुस्लिमांच्या व त्यांच्या पुढाऱ्यांच्या मनोवृत्तीबद्दल मला चांगली कल्पना आली आणि म्हणूनच मी तरी If they come, with them If they don't come without them, and if they oppose inspite of them आम्ही आमचे स्वराज्यप्राप्तीचे प्रयत्न केले पाहिजेत या ठाम मताचा झालो आहे.

## डॉ. हेडगेवार सावरकर भेट

इतर अनेक पुढाऱ्यांप्रमाणे आद्य सरसंघचालक डॉ. हेडगेवार हेही



सावरकरांना १९२५ सालच्या फेब्रुवारी मार्चच्या दरम्यान भेटून गेल्याचे मला पक्के स्मरते. मध्यम उंची, भरदार शरीर, डोक्यावर उंच टोपी, कपाळावर आडवे गंध, करड्या रंगाच्या कोटाचे आत पाठीमागचे बाजूस कोटाखाली आलेला शर्ट गुडघ्याच्या थोडेसे खालीपर्यंत असणारे धोतर नि पायात बूट असे ते सारा नाव-पुरी व्यक्तिमत्व आजही माझ्या डोळ्यासमोर आहे. आमचे घरी तात्यांसमवेत ते दुपारी जेवावयास होते व सायंकाळी सावरकर व ते असे दोघेही रत्नागिरीस निघून गेले. त्यानंतर माननीय माधवराव मुळे यांनी शिरगांव येथे १९३५ सालच्या दरम्याने राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची शाखा सुरू केली. कांही महिने आमच्या गांवातील या संघाच्या प्रातः शाखेत मी जात असे.

## चांभार हे महाराचे ब्राह्मण

शिरगांवांत त्यावेळी चांभाराचे एक घर होते. तात्या आमच्याकडे होते त्या कालावधीत त्यांच्याकडे सत्यनारायणाची पूजा झाली व त्याने तात्यांना व आम्हालाहि इतरांबरोबर आमंत्रण केले. चांभाराच्या घरी सत्यनारायणास जाऊन तिथे तीर्थप्रसाद ग्रहण करणे ही त्या काळांत एक भयंकर गोष्ट समजली जात असे. पण रात्री तात्या जाण्यास निघाल्यानंतर आम्हांला जाणे भागच होते.

तात्या व आम्ही तिथे गेल्यानंतर आमचे सर्वांचे आदरपूर्वक स्वागत करण्यात आले. तात्या तिथे गेल्यावर त्यांनी प्रथम आपल्या महार बंधूंना आमंत्रण आहे किंवा नाही हा प्रश्न विचारला. 'नाही' असे कळताच सावरकर एकदम म्हणाले, "तर मग मी नाही तुमच्या आमंत्रणाचा स्वीकार करु शकत. मी, हे विष्णुपंत व त्यांच्या घरची मंडळी येथे आली. ब्राह्मण मंडळी आली म्हणून तुम्हांला आनंद वाटला आणि ते योग्यहि आहे. पण आम्ही मंडळी तुम्हाला हीन समजतो, तसेच तुम्ही आपल्या महार बंधूंना हीन समजता. आम्ही तुमचे ब्राह्मण तर तुम्ही त्या महारबंधूंचे ब्राह्मण."

सावरकरांनी केलेल्या या खडे-उच्चारणांनंतर ताबडतोब त्या रात्रीच महारबंधूंना आमंत्रण करण्यात आले. व त्यांपैकी चारसहा जण आलेहि. मग मात्र या समारंभ ठीक पार पडला. तात्यांचे छोटेसे भाषणहि झाले, त्यांत त्यांनी सर्व हिंदु लोक समान असून त्यांत जन्माने उच्चनीच कोणी नाही या मुद्याचा ऊहापोह केला.

समारंभात एक गंमत झाली. आम्हां तथाकथित उच्चवर्णीयांना तीर्थप्रसाद देण्याचे काम सत्यनारायणाच्या भटजीकडे सोपविण्यात आले होते. ते पाहताच तात्या म्हणाले, "असे का? आम्हाला तुम्ही दिलेला तीर्थ-प्रसाद चालेल की! नव्हे, तुम्हीच तो दिला पाहिजे."

तेव्हा त्या चांभाराच्या घरची मंडळी तीर्थप्रसाद घेऊ लागली. तात्यांनी शटकन तीर्थ प्राशन केले, प्रसाद तोंडात टाकला. माझे वडील कुंभा संस्कारात वाढलेले, त्यांनी तीर्थ डोळ्याला लावल्यासारखे केले व प्रसादाची पुडी बांधून घेतली. आम्हा लहान मुलांना मात्र काय करावे ही पंचाईत पडली. तीर्थप्रसाद ग्रहण करावा तर वडील काय म्हणतील ही भीति आणि न करावा तर तात्यांना काय वाटेल ही शंका.

आमची ही अडचण बहुधा तात्यांच्या लक्षात आली असावी. ते लगेच म्हणाले, "अरे, खाऊन टाका प्रसाद आणि तीर्थ. विष्णुपंतांची गोष्ट निराळी. त्यांची पंचावन्न वर्षे जुन्या वातावरणात गेली. पण तुम्हांवर हे नवीन संस्कार लहानपणापासूनच झाले पाहिजेत."

घरी आल्यावरही आम्ही कपडे बदलण्याचे कारण नाही हेही तात्यांनी वडिलांसहित सर्वांना निक्षून सांगितले होते. व त्याप्रमाणेच सर्वांनी वर्तन केले.

## एक हृद्य आठवण

आमच्या घरी विहिरीचे व पाटाचे पाणी असे. पाटाचे पाणी साधारणतः माघ महिन्यापर्यंत येई. पुढेही एखादा दुसरा महिना येई. पण ते रात्रीच्या वेळी व अगदी बारीक. विहीर खूप लांब असल्याने जवळ असलेल्या पाटाचे पाणी घरात भरण्याची घरच्या मंडळींची धडपड असे. साधारणतः रात्री बारा वाजेपर्यंत पाटाच्या पाण्याने पाच सहा कळशा पाणी मावणारी दोन पिंपे भरे व मग ते पाणी घरात आणण्यात येई. घरात पंधरा वीस कळशा तरी पाणी लागे व ते भरण्याचे काम घरची बायका मंडळी करीत. साधारणतः रात्रीचे बारा वाजत हे पाणी भरून व्हायला.

तात्या रात्री आठच्या सुमारास जेवण झाले म्हणजे जवळजवळ साडेदहा वाजेपर्यंत त्यांच्या खोलीत वाचन-लेखन करीत व साडेदहाच्या सुमारास बाहेर अंगणात शतपावलीच्या येरझारा घालीत. त्यांचा हा कार्यक्रम साधारणतः वीस-पंचवीस मिनिटे चाले. आमच्या घरच्या मंडळींची पाणी भरण्याची वेळ याच वेळेपासून होती.

एका रात्री त्यांची ही शतपावली चालू असता आमची जी बाया (आमच्या घरावर अत्यंत प्रेम करणारी व अखेरपर्यंत आमच्या घराशी जडलेली आमची एक दूरची नातलग) पाणी भरतांना त्यांच्या दृष्टीस पडली. बायांचे वय त्यावेळी सत्तरच्या दरम्यान असावे. बायाला पाणी भरतांना पाहून तात्यांचे अंतःकरण कळवळले.



मी त्या वेळी त्यांच्याबरोबरच येरझारा घालीत होतो. एकदम ते मला म्हणाले, "अरे, त्या बाया एवढ्या वृद्ध! त्या पाणी भरतात आणि तूं इकडे माझ्याबरोबर नुसत्या येरझारा घालतोस! जा आणि त्यांच्या हातातील कळशी घेऊन पाणी भरायला लाग! तू दमलास तर मी तुझ्या मदतीला येतो."

सावरकरांच्या या आदेशानंतर बाया 'नको नको' म्हणत असता त्या दिवशीचे पाणी मी भरल्याचे मला पक्के स्मरते. नंतरही मधूनमधून निकराचे का होईना, तात्यांच्या धाकाने मी हे काम करीत असे.



# अस्पृश्यता-निर्मूलन, व्यायामप्रसार आणि स्वदेशीचा आग्रह ही त्रिसूत्री

## पाहुण्यांचा चहा बंद !

सावरकर शिरगाव येथे असताना त्यांना भेटण्यासाठी रत्नागिरीहून मंडळी अधूनमधून आमच्या घरी येत. त्यावेळी आमची सांपत्तिक परिस्थिती यथातथाच होती. त्यामुळे सावरकरांना भेटण्यास कोणी थोर नेते किंवा प्रतिष्ठित मंडळी आली म्हणजे चहापाण्याने त्यांचे आदरातिथ्य करणे आमच्या घराला थोडे जिकिरीचे होई. कित्येकदा शेजारच्या घरातून पटापट, साखर व दूध यापैकी एक किंवा केव्हा केव्हा सर्व वस्तु उसन्या आणाव्या लागत.

भेटण्यास आलेल्या गृहस्थांशी तात्या एकदा बोलत असताना घरात चहासाठी दूध व साखर नसल्याची बायकामंडळीत चाललेली कुरबूर तात्यांच्या कानी पडली असावी. कारण त्या दिवसापासून त्यांना भेटावयास येणाऱ्या मंडळींना ते बाहेर अंगणात भेटत व चर्चा संपली म्हणजे तेथूनच त्यांना निरोप देत. अर्थात् तसाच एखादा थोर किंवा जवळकीचा गृहस्थ आला तर तात्या आपण होऊनच चहा करण्यास सांगत व त्याचा भार आम्हांवर पडू नये म्हणून चहाचे साहित्य आणवीत.

## केल्याने होत आहे रे !

आपल्याला भेटण्यास येणाऱ्या मंडळींना मुख्यतः तरुणांना-ते तीन गोष्टी निक्षूने आचरण्यास सांगत. पहिली गोष्ट म्हणजे अस्पृश्यता न पाळणे. त्याबाबत त्यांचे सूत्र असे असे की, परधर्मीय मुसलमान वा ख्रिश्चन यांच्याशी स्पृश्य ज्याप्रमाणे व्यवहारात वागतात त्यापेक्षाही थोडे अधिक जवळकीने, निदान तितके तरी आपण तथाकथित अस्पृश्यांशी वागले पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे तरुणांनी व मुलांनी रोज नियमितपणे व्यायामशाळेत जाऊन शरीरसंपदा कमावलीच पाहिजे. भोक्तानी आमच्या मुलाबाळांना व्यायाम शाळेत पाठविले



पाहिजे. बौद्धिक शिक्षणाइतकेच शारीरिक शिक्षण आवश्यक आहे. आणि तिसरी गोष्ट म्हणजे स्वदेशी व्रत. ज्या वस्तू स्वदेशी मिळतात त्या थोड्या महाग पडल्या तरी कटाक्षाने स्वदेशीच वापरल्या पाहिजेत.

अस्पृश्यता-निवारण करण्यात कांग्रेस विचारसरणीच्या कार्यकर्त्यांमध्ये आणि हिंदु संघटकांच्या हेतूमध्ये फरक असला तरी अस्पृश्यता नष्ट झाली पाहिजे याबाबत दोघांचे मतैक्य असल्याने अस्पृश्यता-निवारणाची चळवळ पहिली दोन-तीन वर्षे या दोन्ही मितप्रणालीच्या लोकांनी संयुक्तपणे केली. रत्नागिरीच्या अस्पृश्य वस्तीत दर एकादशीला संमिश्र भजनाचा कार्यक्रम असे व त्या वेळी अण्णासाहेब पटवर्धन आणि सावरकर त्या भजनाला पुष्कळदा एकत्र असत. अप्पासाहेब पटवर्धन व त्यांचे सहकारी श्री. गंगाधरपंत मागाडे यांनी एक संमिश्र मेळाहि काढला होता.

स्वदेशी व्रताबाबतहि हीच गोष्ट होती. दोन्ही मतप्रणालींच्या लोकांत स्वदेशी-प्रचाराबाबत संपूर्ण एकमत असल्याने त्याचा प्रचार करण्यासाठीहि एक संमिश्र मेळा काढण्यात आला होता, पत्रके छापण्यात आली होती. साखर, साबण इत्यादि निवडक पंचवीस स्वदेशी वस्तूंची यादी करून त्या कोणत्या दुकानात मिळतील तेहि नमूद करण्यात आले होते. यापैकी काही वस्तु न खपल्यास त्या परत घेण्याची हमीहि त्या दुकानदारांना देण्यात आली होती. दिवाळीच्या सणांत फटाक्यांवर बहिष्कार घालण्याबाबत आवाहन करण्यात आले होते. पहिली दोनतीन वर्षे अस्पृश्योद्धाराबरोबरच स्वदेशी-प्रचारानेहि सावरकर व पटवर्धन यांनी धमाल उडवून दिली होती.

आम्हा मुलांचे त्याबाबत काम म्हणजे "कष्ट चला स्वदेशीच्या अंगीकाराला पुण्यप्रद हे सोपेसेल हे भडके तरी गाळा ।। गोड विष तसे विलायती त्या त्यागु वस्तुला ।।" इत्यादी स्वदेशीचा प्रचार करणारी सावरकर-रचित पदे म्हणत आळीआळीतून एकदा नगरभर फिरणे व दर पंधरवड्यास ज्या दुकानदारांकडे स्वदेशी वस्तु विक्री-साठी ठेविलेल्या असत त्यांतील खपल्या किती, राहिल्या किती, नवीन किती मागवावयाच्या इत्यादींची टिपणी तात्यांना व श्री. सीतारामपंत पटवर्धन यांना देणे ही होती.

आश्चर्याची गोष्ट अशी की, या वस्तु जोरदार प्रचारामुळे सहा महिन्यात तिपटीने खपू लागल्या. तात्यांनी हे पाहिले तेव्हा "केल्याने होत आहे रे, आधी केलेचि पाहिजे" ही समर्थोक्ति त्यांच्या तोंडून उत्स्फूर्तपणे बाहेर पडली.

## बंद न पडलेली व्यायाम शाळा !

व्यायाम-शाळा स्थापनेबाबत मात्र सावरकरांना विरोधी विचारसरणीच्या लोकांचे फारसे सहकार्य मिळाले नाही. तथापि त्यांनी नगरपालिकेमध्ये

कै. डॉ. शिंदे यांच्याकडून ठराव आणवून रत्नागिरी नगरासाठी एक व्यायामशाळाही सुरू करविली. टिळक आळीतील लोकमान्य मंडळासारख्या ज्या काही तुरळक संघटना होत्या त्या संघटनांनाहि व्यायामशाळा सुरू करण्यास उद्युक्त केले आणि अशा रीतीने तीन व्यायामशाळा रत्नागिरीत सुरू झाल्या. आम्ही शिरगाव-करांनीहि त्या सुमारास एक व्यायामशाळा आमच्या गावांत सुरू केली.

सावरकरांच्या खटपटीमुळे १९२५ साली रत्नागिरी नगरपालिकेने स्थापन केलेल्या नगर व्यायामशाळेचा वर उल्लेख आलाच आहे. तीस वर्षांनंतर म्हणजे १९५५ साली सावरकर रत्नागिरीला त्यांनीच सुरू केलेल्या अखिल हिंदु गणेशोत्सवाच्या रौप्य महोत्सवासाठी आले असता या व्यायामशाळेच्या चालकवर्गाने त्यांना आपल्या संस्थेला भेट देण्याबद्दल विनंती करण्यासाठी व्यायाम-शिक्षकांना पाठविले. सावरकर त्या वेळी श्री. आबासाहेब पटवर्धन यांच्या घरी विश्रांती घेत होते. व्यायामशाळेच्या शिक्षकांनी आदबीने हात जोडून व्यायामशाळेला भेट देण्याबद्दलची विनंती केली. त्यावेळी तात्या गहिवरल्यासारखे म्हणाले, "काय ? अजूनहि ती व्यायामशाळा सुस्थितीत चालू आहे ? विशेष आहे ! माझा हात ज्याला ज्याला लागला होता त्या त्या बहुतेक सर्व संस्थांचे वा व्यक्तींचे गेल्या काही वर्षांत भस्म झाले. माझा हात लागलेला असूनहि ही संस्था भस्मसात झाली नाही, उलट सुस्थितीत आहे. आनंद आहे."

## अय्यर-सावरकर भेट

सावरकरांना शिरगावात भेटण्यासाठी त्यांचे लंडनमधील निकटवर्ती सहकारी व मद्रासचे सुप्रसिद्ध क्रांतिकारक श्री. व्ही. व्ही. एस. अय्यर आले होते. या दोन थोर क्रांतिकारकांच्या भेटीच्या दिवशी सी. आय. डी. खात्याची केवढी धावपळ उडाली. रत्नागिरी-शिरगाव रस्ता गुप्त पोलिसांनी व्यापून टाकला होता. सरकारी स्तरावर तारातारी सुरू होती. आमच्या घराच्या आसपास गुप्त पोलिस घुटमळत होते.

अशा या वातावरणात श्री. अय्यर रत्नागिरीहून डमनीने शिरगावात आले (त्याकाळी कोकणात मोटारी अगदी क्वचित नव्हत्याच. प्रवासाचे मुख्य साधन म्हणजे वर उल्लेख केलेली डमनी. रत्नागिरीच्या बाजूला डमनीला सारवट गाडी म्हणतात.) आमच्या घरापासून सुमारे अर्धा पाऊण फर्लांगावर डमनी थांबत असे व तेथून आमच्या घरापर्यंत चालत यावे लागत असे. सावरकर आपल्या या जुन्या सहकाऱ्याचे स्वागत करण्यासाठी डमनी थांबते तेथपर्यंत अगोदरच येऊन उभे होते.



मी, माझे वडील व धोरले बंधूही तात्यांच्या बरोबर तेथपर्यंत गेलो होतो. काही वेळाने अय्यर आले व डमनीतून खाली उतरले. खाली उतरताच तात्यांनी त्यांना व त्यांनी तात्यांना कडकडून मिठी मारली.

श्री. अय्यर त्यादिवशी सायंकाळ पर्यंत आमच्या घरी होते. पहिल्याने सर्व मंडळी समक्ष मारलेल्या यथासांगच्या गप्पा त्यांनी मारिल्या. जेवण झाल्यानंतर ते दोघे आमच्या कोठारात जे एकदा गडप झाले ते भज्ज एकदा चहा पिण्यासाठी बाहेर आले तेवढेच.

शिरगावच्या वास्तव्यात सावरकरांनी प्रसंगोपात काही स्फुटलेखन केले. 'हिंदुचे एकराष्ट्रगीत', 'कर, चला ,स्वदेशीच्या अभिमानाला, लक्ष्मी पूजन कर घराघरी आम्ही जरी नांदे' अशा प्रकारची प्रसंगोचित स्फुट काव्य रचना केली. याच वास्तव्यात त्यांनी 'हिंदुपदपादशाही' हा इंग्रजी ग्रंथ लिहून पुरा केला. हे सर्व लिखाण आपल्या जोखडी टेकेचे 'डेस्क' बनवून व जमिनीवर बसण्यासाठी एक साधीशी बैठक टाकून केले.

## दिवसाचे वेळापत्रक

आमच्या घरांत रहात असतांना सावरकरांचा दिनक्रम पुढीलप्रमाणे असे. सकाळी सातच्या सुमारास ते उठायचे. शौच-मुखमार्जन झाल्यावर सुमारे वीस-पंचवीस मिनिटे मुख्यतः डंबेल्सच्या साहाय्याने व्यायाम. तोपर्यंत साधारणतः आठ वाजत. नंतर अंडे मिश्रित एक कप दूध ( आमच्या घरांत अंडे खाणे वर्ज असल्याने ते बहुधा ओटीच्या अगदी एका बाजूला हे दूध घेत. ) व तावडतोब एक कप चहा. यात साधारण साडेआठपर्यंत वेळ जाई. नंतर दुपारी अकरापर्यंत वाचन–लेखन. सकाळी तसाच कोणी मनुष्य आला तर त्याची भेट घेत. नाहीपेक्षा भेटीचा वेळ ही सायंकाळी जेवणानंतर असे. सुमारे साडेअकरा वाजता कोमट पाण्याने स्नान. स्नानाला त्यांना खूप पाणी लागे. स्नान झाल्यावर ते डोक्याच्या केसांना थोडे तेल लावीत. स्नान झाल्यावर सुमारे पंधरा–वीस मिनिटांपर्यंत ओसरीच्या जागेत ध्यानस्थ बसत. साडेबाराच्या सुमारास दुपारचे जेवण होई. जेवण साधेच असे-भात, भाजी, आमटी, चपाती व एखादी चटणी किंवा कोशिंबीर.

जेवण झाल्यावर लवंग किंवा वेलदोड्याच्या दाण्याने मुखशुद्धि. नंतर सुमारे अर्धा तासपर्यंत वर्तमानपत्रांचे वाचन. वर्तमानपत्रे वाचतांना त्यांच्या दृष्टीने महत्वाच्या बातम्यांवर ते खुणा करीत असत.

नंतर सुमारे पाऊण तास ते एक तास वामकुक्षी करीत. वामकुक्षी झाल्या-वर अडीच वाजता ते उठत व तावडतोब दुपारचा चहा झाला की, पाच वाजे-

पर्यंत कोणी भेटण्यास आले असेल तर त्याची भेट. सायंकाळी पुन्हा बाहेर फिरावयास जाणे. ६॥ ते ७॥ पर्यंत आपल्याशी गप्पागोष्टी. आठच्या सुमारास जेवण. नंतर ते सुमारे दहा-अकरा पर्यंत वाचन व नंतर, अर्धा तास बाहेर अंगणात येरझार व नंतर झोप.

नाश्ता सामान्यतः पाल्याच्या वस्तऱ्याने एक दिवसाआड स्वतः दाढी करीत. तेव्हा ते लांब कल्ले राखीत असत, पण मिशी काढीत नसत.

त्यांचा पोशाखहि साधा व नीटनेटका असे. पांढरे शुभ्र धोतर, तसाच साध्या कॉलरचा पांढरा शुभ्र शर्ट. त्यावर इतर वेळी पांढऱ्या रंगाचा कोट, डोक्यावर बाटोळी काळ्या रंगाची टोपी. थंडीत मात्र ते किरमिजी रंगाचा लोकरी कोट घालीत.

बाहेर जातांना ते नेहमी हिना अत्तर कोटाला व शर्टाला लावीत. रात्र असो वा दिवस, ते नेहमी छत्री बरोबर घेऊन जात.



# अस्पृश्यता निवारणाबरोबरच शुद्धीकरण

## भाषा शुद्धी

एकोणिसशेचोवीस साली सशर्त सुटका झाल्यानंतर पहिली तीन वर्षे म्हणजे १९२६ अखेरपर्यंत सावरकरांनी अस्पृश्यता-निवारण स्वदेशी-प्रचार व मल्लसंवर्धनासाठी व्यायामशाळांचा प्रसार या तीन गोष्टींवर मुख्यतः भर दिला ही गोष्ट खरी असली तरी पुढे महाराष्ट्रभर ज्या त्यांच्या भाषाशुद्धीच्या आंदोलनाने धमाल उडाली त्या भाषाशुद्धीचे कार्यहि या काळात सुरु झालेले होते.

रत्नागिरीच्या 'बलवंत' मध्ये हुतात्म्याला 'हुतात्मा' प्रति-शब्द येणे रत्नागिरीच्या 'नेटिव्ह जनरल लायब्ररी'चे 'नगरवाचनालया'त वा नगर ग्रंथालया'त नामांतर होणे, 'हेडमास्तरसाहेब' चा 'मुख्याध्यापकमहाशय' बनणे विद्यार्थ्यांनी शाळांतून 'हजर' च्या ऐवजी 'उपस्थित' चा पुकारा करणे इत्यादि भाषाशुद्धीचे तुरळक प्रकार सुरु झाले होते आणि कोणत्याहि नवीन गोष्टीची आरंभीच्या काळात जशी हेटाळणी होते त्याप्रमाणे या भाषाशुद्धीबाबत घडू लागले होते.

याच काळात सावरकरांनी विद्यार्थ्यांसाठी हिंदीचे वर्ग चालविले. सावरकरांना भारताची हिंदी हीच राष्ट्रभाषा अभिप्रेत होती-मात्र ती हिंदी संस्कृतनिष्ठ असली पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. त्याचप्रमाणे त्यांनी लिपिशुद्धी व भाषाशुद्धी मंडळे स्थापन केली, जातिभेदोच्छेदक संस्थेला जन्माला घातले. पहिले भारतीय वायुवीर रत्नागिरीचे कॅप्टन दत्तात्रय लक्ष्मण पटवर्धन तथा 'डी. लॅक्मन' यांच्या देखरेखीखाली ' रायफल क्लब ' ची त्यांनी स्थापना केली. माझे बंधु श्री. गजाननराव दामले यांच्या व्यवस्थापनाखाली 'अखिल हिंदु उपाहारगृह' सुरु केले. तात्पर्य, हा पांच-सहा वर्षांचा कालखंड म्हणजे सावरकरांनी रत्नागिरी मध्ये समाजक्रांतीचे जे यज्ञकुंड चेतविले होते आणि ज्याच्या प्रज्वलित ज्वालांनी अखिल महाराष्ट्र उजळला जात होता असा कालखंड होता.

## अमोघ वक्तृत्व !

मी या कालखंडात तात्यांची पन्नास-पाऊणशे तरी भाषणे सहज ऐकली असतील. त्यांच्या कोणत्याही भाषणाचा साचा बहुधा ठरलेला असे. अत्यंत सावकाश व संथपणे ते आपल्या भाषणाला सुरुवात करीत ; सुरुवातीला 'अध्यक्ष महाशय' किंवा असेच काही तरी संबोधण्याचा संकेत ते कधीच पाळीत नसत. वक्त्याला आवश्यक असणारा बहुश्रुतपणा, विद्वत्ता इत्यादि गोष्टींचे भांडार त्यांच्या ठायी वास करीत असल्याने आणि सरस्वतीचा वरदहस्त त्यांच्यावर असल्यामुळे पहिल्या पाच-दहा मिनिटांतच ते आपल्या विषयाशी तादात्म्य पावत आणि मग पुढील चाळीस-पंचेचाळीस मिनिटे त्यांचे भाषण क्षणाक्षणाला अधिकाधिक रंगत जाई. वक्ता व श्रोता यांमधील दुरावा कमी कमी होत होत शेवटी दोघांचीहि ब्रह्मानंदी टाळी लागे आणि नेमक्या याच परमोच्च बिंदूवर सावरकरांचे भाषण संपे.

सावरकरांच्या भाषणांपैकी माझ्या मनावर कायमचा ठसा ठेवून गेलेली तीन भाषणे होत. पहिले म्हणजे स्वामी श्रद्धानंदजींचा खून झाल्यानंतरचे, दुसरे म्हणजे लाला लजपतराय यांच्या मृत्यूनंतरचे आणि तिसरे म्हणजे 'आऊटपटकेचे नव्हे आठ शतकांचे साम्राज्य' या विषयावर भाऊसाहेबांनी दिल्लीचे मुस्लिम तख्त फोडले या घटनेवरील.

स्वामी श्रद्धानंदांसारख्या ऋषितुल्य पुढाऱ्यांच्या खुन्याला गांधीजींनी 'भाई अब्दुल रशीद' म्हणून संबोधिल्याने सावरकरांचे आधीच पेटलेले रक्त आणखीनच पेटून गेले होते. त्यांच्या या भाषणात वीररसाला जणू साकार स्वरूप प्राप्त झाले होते. तो जणू त्या दोन-तीन हजारांच्या हिंदुसमाजाला चेतावणी देत होता. 'तिकडे स्वामीजींनी समाजासाठी बलिदान केले आणि तुम्ही इकडे षंढासारखे खाली माना घालून आसवे ढाळीत आहा. तुम्हांपैकी कोणालाहि असा देवच किंवा आवेश येत नाही का की जो या भ्याड कृत्याचा प्रतिशोध घेऊ शकेल ? तसा जर कोणी असेल किंवा असतील तर "ये करी शिरा जा तुज पुरवि तो हेतु," असा आशयाच्या वाक्यांनी त्यांनी आपले भाषण संपविले.

## धर्मशुद्धी

अस्पृश्योद्धाराबरोबरच सावरकरांचे शुद्धीकरणाचे कार्यही सुरू होते. श्री. जाधव, श्री. कळीत इत्यादींची शुद्धी करून त्यांना हिंदु धर्मात परत घेण्याची कार्ये अगोदर झालेलीच होती. पण सावरकरांनी घडवून आणलेले महत्त्वाचे शुद्धीकरण म्हणजे खारेपाटणच्या धावस कुटुंबाचे. दहा पंधरा वर्षांपूर्वी ख्रिस्चन



झालेल्या या कुटुंबाला सावरकरांनी शुद्धिसमारंभ करून परत हिंदु धर्मात घेतले. समाजात स्थळविले इतकेच नव्हे तर त्यांच्या दोन उपवर मुलींची लग्ने योग्य अशा घराशी करून दिली. आणि एका मुलीच्या लग्नात तर श्री. धाक्रस यांच्या आग्रहावरून कन्यादानही केले.

या विवाह-समारंभाचे पौरोहित्य करणाऱ्या भिक्षुकांनी कन्यादानाच्या वेळी सावरकरांना रूढीप्रमाणे पटका बांधण्यास सांगितले. तेव्हा 'मला पाखंडा-लाही तुम्ही शुद्ध करण्याचे ठरविलेले दिसते' असा विनोद करून सावरकरांनी पटका बांधला व कन्यादान केले. पटका बांधलेले हे सावरकरांचे दुर्मिळ छाया-चित्र अद्यापिही सावरकरांच्या संग्रहालयात असावे असे वाटते. या विवाहाचा सर्व खर्च सावरकरांनी स्वतंत्र निधी उभारून केला.

## सनातनी-सुधारक रस्सीखेच !

सामान्यतः परधर्मीयांना आपण परत घेतो तेथपर्यंत तरी अस्पृश्यांना सवर्ण हिंदूंनी घरात घ्यावे, सर्व सार्वजनिक ठिकाणी स्पृश्यास्पृश्य भेद पाळला जाऊ नये, देवालयाबाबत पायरी पर्यंत तरी अस्पृश्यांना मज्जाव नसावा इत्यादि सावरकरांनी प्रचारिलेल्या गोष्टी आता समाजाच्या अंगवळणी पडू लागल्या होत्या. पण त्यावर संतुष्ट न रहाता गतिमान असणे हा सावरकरांच्या कोणत्याही आंदोलनाचा एक महत्त्वाचा भाग असे. म्हणून देवालयाच्या 'पायरीनंतर सभा-मंडप आंदोलन' सावरकरांनी सुरू केले. स्पृश्यास्पृश्यांचे संमिश्र मेळे देवालयाच्या सभामंडपात जाण्यास काहीच हरकत नाही असा प्रचार सुरू केला. त्याला अनुकूल असलेल्या लोकांच्या साह्याने गोळा केलेल्या कोणत्याही सार्वजनिककार्यक्रमाच्या वेळी अस्पृश्य मानल्या गेलेल्या बांधवांना बरोबर घेऊन ते देवळात जाऊ लागले.

तात्यांच्या या आंदोलनामुळे आतापर्यंत त्यांना अनुकूल असलेले लोक मोठ्या प्रमाणात त्यांना सोडून जाऊ लागले. त्यांच्या बाजूला आता विचारपूर्वक सुधारक असलेले तेवढेच लोक काय ते राहिले. सामान्य लोकांना अस्पृश्यांचा देवालय प्रवेश हा त्या काळी भयंकर भ्रष्टाचार वाटला यांत काहीच नवल नाही. सनातनी वृत्तीच्या लोकांनी तर सावरकरांना विरोध करण्याचे कंकणच बांधिले.

१९२८ अखेरपर्यंत सावरकर आपल्या कोणत्याही नव्या आंदोलनाचा उपक्रम करीत तो सार्वजनिक गणेशोत्सवांतून आणि रत्नागिरीच्या पुरातन श्रीविठ्ठल मंदिरातून. सार्वजनिक गणेशोत्सवसमितीत सावरकरांच्या विचारप्रणालीचे बहुसंख्य सदस्य असत. परिणामतः कोणत्याही नव्या आंदोलनासाठीही गणेशोत्सव समिती हे सावरकरांचे व्यासपीठ होते. पण वरील घटनेनंतर गणेशोत्सव समिती ' आपली बनविण्याचे सनातनी मंडळींनी ठरविले. संमिश्र मेळा सभामंडपात गेला तर

'त्याला आमची संमति नव्हती ' असा त्यांच्या उलट समितीच्या काही सभासदांनी करावा तर इतरांनी 'आमची संमति होती ' असे प्रसिद्ध करावे. अस्पृश्यता ही धर्मशास्त्राला धरून असल्याने तिचे पालन केले जावे असे म्हणणाऱ्या गो. म. जोशीरावकरांची व्याख्याने मुद्दाम सनातन्यांनी घडवून आणावीत तर सावरकर, नित्यवशास्त्री, महादेवशास्त्री दिवेकर इत्यादि आधुनिक विचारवंतांची अस्पृश्यता निषेधाची व्याख्याने सुधारकांनी घडवून आणावी अशी सनातनी सुधारकांमधील रस्सीखेच पुढे जवळजवळ दोन वर्षे सुरू होती. अस्पृश्यांच्या प्रश्नाबाबत समाज यामुळे अगदी खालच्या थरापासून ढवळून निघत होता ही गोष्ट खरी. अस्पृश्यतेबाबत अनुकूल वा प्रतिकूल चर्चा याविना रत्नागिरीच्या वातावरणात इतर विषयच नव्हता.

पण अस्पृश्यांच्या देवालय-प्रवेशाच्या सावरकरांच्या या आंदोलनामुळे सार्वजनिक गणेशोत्सव समितीचे सावरकरांचे व्यासपीठ काहीसे डळमळू लागले होते. त्यामुळे असे नवीन व्यासपीठ स्थापण्याची गरज उत्पन्न होऊ लागली होती की ज्या ठिकाणी त्यांना आपल्याला आवश्यक वाटणारे कोणतेही हिंदु समाजोद्धारक आंदोलन अनिर्बंधपणे उभारू शकतील. श्रीपतितपावन मंदिराच्या उभारणीचे बीजारोपण याच कल्पनेतून झाले.

## स्वकीय-परकीय रस्सीखेच

सावरकरांना अशा रीतीने एका बाजूने स्वकीय सनातन्यांचा विरोध होऊ लागला असतानाच दुसऱ्या बाजूने मुस्लिम समाजही स्वस्थ बसला नव्हता. त्यावेळी सुमारे शंभर मुसलमानांच्या सह्या असलेला एक अर्ज रत्नागिरीच्या मुस्लिम कलेक्टर मार्फत मुंबई सरकारकडे पाठविला. त्यात असे म्हटले होते की " सरकारने सावरकर यांना रत्नागिरीला स्थानबद्ध केल्यापासून त्यांनी हिंदु लोकांची मने मुसलमान लोकांविरुद्ध धर्मांच्या बाबतीत दूषित करून दोन समाजामध्ये द्वेषभाव उत्पन्न केला आहे, व त्या द्वेषाचा परिणाम हिंदु समाजावर इतका झाला की, ते कोणत्याही रीतीने मुसलमानांची कुरापत काढून मारामाऱ्या करण्यापर्यंत प्रवृत्त झाले आहेत. इतकेच नव्हे तर सावरकर यांची जी जी म्हणून भाषणे होतात ती ती मुसलमानांविरुद्ध चिथावणी देणारी व अपमानकारक अशा प्रकारची असतात. त्यामुळे आजपर्यंत गुण्यागोविंदाने नांदणारे रत्नागिरीतील हिंदु व मुस्लिम यांच्यात वैरभाव उत्पन्न झाला असून त्याला कारण सावरकरांची शिकवण आहे. तरी सरकारने सावरकरांना दुसऱ्या कोणत्या तरी ठिकाणी ठेवावे."

त्या खोडसाळ अर्जाला प्रत्युत्तर म्हणून चौदाशे हिंदूंच्या सह्या असलेला अर्ज लेस्ली विल्सन रत्नागिरीत आले त्यावेळी त्यावेळचे राष्ट्रीय पक्षाचे



नामदार श्री. व्यंकटराव सुर्वे यांनी गव्हर्नर साहेबांच्या हाती दिला. या दोन्ही अर्जांबाबत सरकारकडून कसून चौकशी कित्येक महिने चालली. शेवटी मुसलमानांच्या अर्जातील खोडसाळपणा स्पष्ट होऊन सावरकरांवर कोणताही ठपका न येता ते सहीसलामत पार पडले. यानंतर थोड्याच महिन्यात रत्नागिरीचे ब्राऊन कलेक्टर यांनी रत्नागिरीच्या मशिदीवरून वाजवल्या जाणाऱ्या वाद्यांबाबत निर्भीड व स्पष्ट ठराव सरकारी नोंद केला. सावरकरांच्या राष्ट्रीय विचारसरणीचा हा मोठाच विजय म्हटला पाहिजे.



# पतितपावन मंदिराच्या उभारणीसाठी पुढाकार

## उच्चार-प्रचार-आचार

कर्मठ सनातन्यांनी व मुसलमानांनी जमेल त्या त्या मार्गांनी विरोध करण्याचे कंकण बांधल्यावर, ज्या स्थानावरून आपल्या सामाजिक क्रांतीच्या आंदोलनाचा उच्चार, प्रचार व आचार आपल्याला निर्वेधपणे करता येईल अशा स्थानाची सावरकरांना आवश्यकता भासू लागली व त्या दृष्टीने त्यांची पावलेही पडू लागली.

हिंदु देवालयांच्या बाबतीत 'पायरीनंतर सभामंडप' या धोरणानुरूप शक्य त्या त्या प्रसंगी पूर्वास्पृश्यांना ते रत्नागिरीतील विठ्ठल मंदिराच्या सभामंडपात अकस्मात घेऊन जात. त्याचबरोबर, परधर्मीयांना आपण आपल्या घरात जेथपर्यंत येऊ देतो त्याच्या एक पायरी पुढे, निदान तेथपर्यंत तरी अस्पृश्यांना येण्यास जे हिंदु नागरिक तयार होते त्यांची यादी सावरकरांनी तयार केली आणि १९२८ सालातील दसऱ्याच्या शुभ दिनी अशा सुमारे आपल्या सव्वाशे अनुयायांसमवेत आणि आठ महार अस्पृश्यांसमवेत सावरकरांनी समारंभपूर्वक अशा घरातून प्रवेश केला. सावरकरांच्या नेहमीच्या खाक्याप्रमाणे ती सर्व नावे प्रसिद्ध करण्यात आली. त्यात [illegible] खानदानी समजली जाणारी घरे होती.

शाळांतूनही अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या मुलांना सरमिसळ बसविण्यात यावे, त्यांना शाळेच्या पडवीत किंवा वर्गात एका बाजूला बसविण्यात येऊ नये म्हणून कायद्यात आलेल्या सरकारी परिपत्रकातील आदेशाची अंमलबजावणी होते की नाही ते पहाण्यासाठी ठिकठिकाणच्या हिंदुसभेच्या अनुयायांना आवाहन करण्यात येई. ज्या शाळांतून या आदेशाची अंमलबजावणी होत नसे (अशा शाळा पुष्कळ होत्या.) त्यांची यादी स्कूल बोर्डाला पाठविण्यात येत असे. कोठे शिक्षकांची समज पाडून तर कोठे त्यांना धाकदपटशा दाखवून त्यांच्या करवी अस्पृश्य मुलांना वर्गात सरमिसळ बसवून घेण्यात येई.



अस्पृश्य मुलांना शाळांतून सरमिसळ बसविणे ही गोष्ट सावरकर हिंदु संघटनांच्या दृष्टीने अत्यंत भरीव आणि मूलगामी समजत. त्यांचा दावा असा असे की, एकदा पुढील पिढीच्या डोक्यातून अस्पृश्यता गेली म्हणजे हिंदु समाजात रूढ बसलेली ही अस्पृश्यतेची अनर्थकारी गोष्ट आठ-दहा वर्षांत आपोआप नामशेष होईल. म्हणून शाळांतून अस्पृश्यता संपूर्णपणे नष्ट झाली पाहिजे, असा त्यांचा कटाक्ष होता व त्यासाठी त्यांनी आपले सर्व लक्ष या आंदोलनावर केंद्रीभूत केले होते.

पण याही आंदोलनाला सावरकरांना प्रखर विरोधाला तोंड द्यावे लागले. कित्येक शाळांतून शिक्षकांचे संप झाले तर कित्येक गावांतून पालकांचा विरोध झाला. काही ठिकाणी शाळांसाठी स्पृश्यांनी दिलेल्या जागा काढून घेतल्या तर कित्येक ठिकाणी अस्पृश्यांनी मुलांना शाळेतच पाठवू नये, पाठविले तर त्यांच्यावर बहिष्कार घालण्यात येईल अशी धमकी ग्रामस्थांकडून देण्यात आली. तरीही शाळेत अस्पृश्यांची मुले सरमिसळ बसविण्याच्या सावरकरांच्या आंदोलनामुळे सर्व रत्नागिरी जिल्हाभर अस्पृश्यता-निवारणाचा प्रश्न घुसळून निघत होता.

## समाजक्रान्ती स्थानाची गरज !

सावरकर आपणाला ज्या स्थानावरून आपल्या समाजक्रांतीचे आंदोलन निर्वेधपणे सुरू ठेवता येईल असे एखादे स्थान रत्नागिरीस निर्माण करण्याच्या विचारात असता १९२८ च्या दरम्यान अशी एक संधी अनायासे त्यांच्याकडे चालून आली. सर्व देवालये अस्पृश्यांना सवर्ण हिंदूंप्रमाणे समानाधिकाराने खुली होणे हेच न्याय्य नि योग्य आहे असेच सावरकरांचे मत होते. कारण या पुरातन देवालयांना हिंदु समाजात एक विशिष्ट स्थान असते. त्याविषयी एक विशिष्ट आदरभावना समाजामध्ये वसत असते. म्हणून रत्नागिरीतील पुरातन देवालये अस्पृश्यांना मोकळी करण्याचे आंदोलन सावरकरांनी चालू ठेवले होतेच.

पण अनेक वर्षांची अस्पृश्यांना देवालय प्रवेशाची बंदी असणारी ही दुष्ट रूढी चुटकीसरशी नष्ट होणे शक्य नव्हते. त्याला काही कालावधी लागणार होता. शिवाय देवालय प्रवेशाबरोबरच सावरकरांना हिंदु समाजातील वेदोक्तबंदी, स्पर्शबंदी, रोटीबंदी, बेटीबंदी, जातिभेद इत्यादि समाजाच्या ऱ्हासास कारणीभूत झालेल्या 'बंद्या' तडातड तोडून टाकावयाच्या होत्या व म्हणून जुन्या देवालयांमध्ये अस्पृश्यांच्या प्रवेशाच्या चळवळीबरोबरच ज्या देवालयात अस्पृश्यांना सवर्ण हिंदूप्रमाणे प्रवेश नि पूजेचे सर्व अधिकार असतील असे एखादे नवे देवालय बांधणे सावरकरांना आवश्यक वाटले. अशा नवीन देवालयाची रत्नागिरीस निर्मिति करण्याचे प्रयत्न सावरकरांनी सुरूही केले होते आणि अनपेक्षितपणे सावरकरांना

अभिप्रेत होती त्यापेक्षा किती तरी भव्य प्रमाणात अशा मंदिराची निर्मिती रत्नागिरीचे दानशूर भागोजी शेठ कीर यांच्या सहाय्याने सावरकरांनी दोन-तीन वर्षांच्या अवधीत घडवूनहि आणली.

## पतितपावन मंदिराचें सूतोवाच ?

रत्नागिरीचे दानशूर भागोजी बाळोजी तथा कीर शेठजी यांनी रत्नागिरीच्या किल्ल्यात श्री भागेश्वर मंदिर नावाचे एक शिवमंदिर अगोदर बांधिले होते. या देवळात दरवर्षी माघ मासात मोठा थाटाचा उत्सव होत असे. १९२८ सालातील या उत्सवाला कै. कीर शेठजींनी सावरकरांना पाचारण केले होते. संभाषणाच्या ओघात श्री भागेश्वरमंदिर बांधण्यास काय कारण घडले हे सांगत असताना श्री कीरशेटजी सावरकरांना म्हणाले, " स्वहस्ते शिवपूजा करावी ही माझी इच्छा दुसऱ्या शिवमंदिरात पूर्ण होईना. कारण मी पडलो जातीने भंडारी. सनातनी लोक मला शिवलिंगाला शिवू देईनात. मग पूजा करणे दूरच, म्हणून स्वतःच्या हाताने शिवपूजा करिता यावी यास्तव हे मंदिर बांधले. आता मी स्वहस्ते शिवसेवा करू शकतो आणि शिवसेवेचा सात्त्विक आनंद उपभोगू शकतो."

त्यावर सावरकर कीरशेठजींना म्हणाले, " आपणाला शिवपूजा करू न देण्यात सनातनी लोकांनी अन्याय केला यात शंकाच नाही. कारण देव भावाचा भुकेलेला असतो. पण सनातन्यांच्या अन्यायामुळे आपण ज्या सात्त्विक आनंदाला मुकला होता त्याच आनंदाला आपले पुष्कळसे बांधव आज शेकडो वर्षे मुकले आहेत त्याचे काय ? आपण सवर्ण असल्याने देवळात जाऊन देवदर्शन तरी घेऊ शकता ; पण त्याच्याहि अस्पृश्यांना बंदी आहे. तेव्हा आपणावर जो अन्याय झाला त्याहीपेक्षा जास्त अन्याय आपल्या अस्पृश्य बांधवांवर होत आहे, हे खरे नाही का ? आपण धनाढ्य असल्याने हे शिवमंदिर बांधू शकलात. पण त्या हीन-दीन दुबळ्या अस्पृश्यांचे काय ? त्यांच्यासाठी त्यांना स्वहस्ते देवमूर्तींची पूजा करता येईल असे एखादे मंदिर आपण बांधून दिले तर सनातन्यांवरील आपला राग मी सार्थ समजेन."

"होईल, आपण म्हणता तसेहि प्रभूची इच्छा असेल तर होईल," कीरशेठजी सद्गदित अंतःकरणाने उद्गारले. सावरकर व कीरशेटजी यांच्यामधील हे पहिले संभाषण म्हणजेच रत्नागिरीतील वैशिष्ट्यपूर्ण पतितपावन मंदिराचे सूतोवाच होय.

## अखिल हिंदूंसाठी पतितपावन मंदिर

श्री पतितपावन मंदिर बांधण्यासाठी जी जागा विकत घ्यावयाची त्यासाठी



श्री. कीर शेटजींनी सहा हजार रुपये सावरकरांच्या हवाली केले. पण तेवढ्या रकमेत जमीन मिळेना व कीर शेटजी तर सहा हजार रुपयांवर त्या जमिनीची किंमत देण्यास तयार होईनात. शेवटी रत्नागिरी हिंदुसभेने वर्गणी गोळा करून आणखी एक हजार रुपये जमविले. तेवढ्यानेही जमीन सुटेना. शेवटी त्या जमिनीवर ज्या सावकाराचा बोजा होता त्यांनी या कार्याचे महत्त्व जाणून दरहजारी शंभर रुपयाप्रमाणे सूट देण्याचे सावरकरांपाशी मान्य केले व त्याप्रमाणे सुमारे साडे आठ हजार रुपये खर्चून श्रीपतितपावन मंदिरासाठी रत्नागिरीच्या वरच्या आळीतील मध्यवस्तीत असलेल्या सुमारे सोळा सतरा गुंठे जमिनीची खरेदी झाली. १९२८ सालच्या दुसऱ्या सहामाहीत ही घटना घडून आली.

१९२९ च्या दहा मार्चला या मंदिराची कोनशिला बसविण्याचा समारंभ श्रीमत् शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांच्या हस्ते पार पडला. त्यावेळी उपस्थित असलेल्या स्पृश्यास्पृश्यांच्या प्रचंड जनसमुदायासमोर सावरकरांनी या देवालयाच्या उद्देशाची कथन केली ती खालीलप्रमाणे–

१) या देवालयात शंख, चक्र, पद्म, गदाधारी भगवान श्रीविष्णूंची लक्ष्मीसह स्थापना करण्यात येईल.

२) त्या मूर्तीची पूजा करण्याचा अधिकार जातीनिर्विशेषपणे सर्व हिंदूंना समान असेल.

३) मात्र अशी पूजा करणाऱ्याने प्रथम देवालयाच्या आवारात स्नान करून व शुद्ध वस्त्रे धारण करून नंतर पूजेसाठी गाभाऱ्यात जावे.

**४) देवालयाचा पुजारी 'स्वधर्मरक्षक' असला पाहिजे, मग तो कोणत्याहि जातीचा असो.**

अशा प्रकारे सर्व हिंदूंना खुले असणारे देवालय अखिल महाराष्ट्रातच काय पण अखिल भारतातहि दुर्मिळ असल्यामुळे या मंदिराला एक वैशिष्ट्य प्राप्त झाले.

या समारंभाच्या वेळी अखिल हिंदूंच्या वतीने शंकराचार्यांना एकच हार घालण्यात आला आणि तो खारेपाटणच्या पांडू विठू महार या गृहस्थाने घातला. शंकराचार्यांनीहि पुढे होऊन प्रसाद म्हणून पांडोबांना श्रीफळ दिले. त्यावेळी अनेकांच्या डोळ्यांतून आनंदाश्रू ओघळू लागले. त्या काळात तरी तो हृदयस्पर्शी प्रसंग होता खास.

सावरकर आपल्या भाषणात म्हणाले " अस्पृश्यांना प्रेमाने शिवून आलिंगणारे दोन शंकराचार्य झाले. पहिले पीठस्थापक आद्य शंकराचार्य काशीला स्नान करून येत असता मार्गात अद्वैत तत्वज्ञानी अशा एका अस्पृश्याला आलिंगिणारे आणि दुसरे हे शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी अखिल हिंदूंचे प्रतिनिधी म्हणून आलेल्या ह्या पांडु शिंदू महाराला हार आणि हात आपल्या गळ्यात घालू देऊन त्या पांडोबाबरोबरच स्वतःहि कृतार्थ झालेले. "

अस्पृश्यता हा हिंदु समाजावरील कलंक आहे असे मानणाऱ्या सावरकरांनी हा कलंक धुवून काढण्यासाठी रत्नागिरीतील आपल्या वास्तव्यात सनातन्यांच्या विरोधाला दाद न देता केवढे मोठे कार्य केले याची आठवण श्री पतितपावन मंदिराकडे पाहिले की कोणालाहि होते.





# सामाजिक समतेसाठी सहभोजनांचा उपक्रम

## मिशन शाळांना शह.

सावरकरांच्या अस्पृश्योद्धाराच्या आंदोलनाचा आणखी एक महत्वाचा परिणाम म्हणजे रत्नागिरी नगरातील व देवरूख, पाली इत्यादि बाहेर ठिकाणी असलेल्या मिशन शाळांना बसलेला पायबन्द. 'विटाळा' चे मूळ बंड कमी झाले असल्याने लोकल बोर्डाच्या शाळांतून अस्पृश्य मुले आली तरी त्याला फारशी कोणाची हरकत राहिली नव्हती. एकच गोष्ट राहिली होती आणि ती म्हणजे मिशन शाळांमधून मिळणारी फी-माफी, मोफत कपडे, पाट्या इत्यादि फायद्याच्या गोष्टी.

यावर मात करण्यासाठी सावरकरांनी हिंदुसभेच्या वतीने दोन उपाय योजिले. एक म्हणजे घरोघर हिंडून ज्या मिशनच्या शाळेत 'हिंदु धर्मात मोक्ष नाही. येशूवर विश्वास ठेवतो तोच तरतो. ज्यांनी येशूवर विश्वास ठेवला नाही ते सर्व नरकात जातात,' अशी शिकवण दिली जाते त्या शाळेत मुलांना पाठविणे हे आपल्या हिंदुधर्माच्या दृष्टीने योग्य नव्हे, उलट पाप आहे असा मिशनऱ्यांच्याच भाषेत हिंदुसभेच्या स्वयंसेवकांकडून प्रचार करविला आणि दुसरा उपाय म्हणजे मिशनऱ्यांच्या शाळेत अस्पृश्य व निर्धन मुलांना मिळणारे फी-माफी, मोफत कपडे वगैरे फायदे लोकल बोर्डाच्या शाळेतहि काही प्रमाणात मिळण्याची सोय एका स्वतंत्र सार्वजनिक निधीची उभारणी करून केली.

परिणामतः कांही मिशन शाळा बंद पडल्या तर कांही बंद पडण्याच्या मार्गावर आल्या. याचा परिणाम म्हणून मुसलमानांप्रमाणेच मिशनरी लोकांनीहि सावरकरांविरुद्ध सरकारकडे अर्ज केले. त्याचा फारसा उपयोग झाला नाही ही गोष्ट निराळी. मिशनऱ्यांच्या शाळांना पायबन्द बसावा म्हणून सावरकरांच्या विनंतीवरून किल्ल्यावर कीरशेटजींनी एक दुमजली टोलेजंग शाळागृह बांधले

आणि त्या शाळेत मिशनच्या शाळांप्रमाणे सर्व लाभ मुलांना देण्याचे सुरू केले. अद्यापहि ही शाळा ' भागेश्वर शाळा ' म्हणून मोठ्या भरभराटीत सुरू आहे.

## अखिल हिंदु गणेशोत्सवाची सुरुवात

श्रीपतितपावन मंदिराकरिता वास्तु मिळून त्याचा कोनशिला समारंभ डॉ. कुर्तकोटी यांच्या हस्ते झाल्याने सावरकरांचे आणखी मताप्रमाणे निर्वेधपणे सभाचळवळीचे कार्य करण्यासाठी स्वतंत्र व्यासपीठ प्राप्त झाले. श्री विठ्ठलमंदिरात प्रतिवर्षी साजरा होणाऱ्या सार्वजनिक गणेशोत्सवाच्या कार्यकारी मंडळात सनातनी विचाराच्या लोकांनी आपले बहुमत करून, अस्पृश्यांना सभामंडपात प्रवेश देण्यास नकार दिला तेव्हा सावरकरांनी सार्वजनिक गणेशोत्सव हा सर्व हिंदूंचा व सर्व हिंदूंसाठी असल्याने अस्पृश्यांसह सर्व हिंदूंना समानतेने भाग घेता येईल असा ठिकाणी तो करावा किंवा श्रीविठ्ठल मंदिराच्या बाहेरील बाजूस मंडप उभारून व तेथे उत्सवमूर्तीची स्थापना करून करावा, पण कोणत्याहि परिस्थितीत हिंदूंच्या सार्वजनिक उत्सवात सर्व हिंदूंना भाग घेता यायला पाहिजे असा आग्रह धरला. स्वतंत्र सभामंडप उभारण्याचा खर्च आपण वैयक्तिकरीत्या देऊ असेही त्यांनी सांगितले.

पण सावरकरांची ही न्याय्य मागणी स्वीकारण्याच्या मनःस्थितीत सनातनी मंडळी नसल्याने यालाही त्यांच्याकडून नकार मिळाला. तेव्हा निरुपायाने सावरकरांनी आणि त्यांच्या काही सहकाऱ्यांनी श्रीविठ्ठल मंदिरातील सार्वजनिक गणेशोत्सवाच्या कार्यकारी मंडळाच्या सभासदत्वाचे त्यागपत्र देऊन ज्या गणेशोत्सवात अखिल हिंदूंना समानतेने भाग घेता येईल असा स्वतंत्र अखिल हिंदु गणेशोत्सव सुरू करण्याचे ठरविले आणि श्रीपतितपावनाचे जे भव्य मंदिर बांधले जात होते व जे जवळ जवळ पूर्ण होत आले होते त्या मंदिरात श्रीमंत कीर शेठजींच्या अनुज्ञेने हा पहिला अखिल हिंदु गणेशोत्सव मोठ्या थुमधडाक्याने साजरा करण्यात आला. १९३० च्या भाद्रपद महिन्यातील ही घटना आहे. 'पॅन हिंदु' या इंग्रजी शब्दाला मराठी प्रतिशब्द 'अखिल हिंदु' हा याचवेळी प्रथम सावरकरांनी योजिला.

## पतितपावनातील पहिला गणेशोत्सव

सावरकरांना ज्या समाजक्रांतिकारक घटना घडून आणावयाच्या होत्या त्या आता निर्वेधपणे करता येऊ लागल्या. श्रीगणपतीच्या मूर्तीची पूजा होताच सर्व हिंदुमात्रांनी उत्सव मूर्तीवर अक्षता व फुले वाहिली. याच उत्सवात मुलांच्या



अखिल हिंदु मेळ्याप्रमाणे मुलींच्या अखिल हिंदु मेळ्याचे कार्यक्रम झाले. दीड हजार स्त्रियांनी भाग घेतलेले अखिल हिंदु हळदीकुंकूहि याच उत्सवात झाले. पण या उत्सवातील विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे शिनु गंधी या मुलाच्या गायत्रीपठणाची होय.

रत्नागिरीमधील तत्कालीन प्रसिद्ध वकील श्री. निशाळ यांनी गायत्री मंत्र उत्तम म्हणणाऱ्या अस्पृश्यमुलाला पाच रुपये बक्षीस ठेवले होते. पाच अस्पृश्य मुलांनी या स्पर्धेत भाग घेतला होता. त्यापैकी बक्षीस मिळाले शिनू गंधीला. शास्त्रशुद्ध स्वरांमध्ये त्याने हेकडी लोकांसमोर गायत्री मंत्र म्हटला तेव्हा उपस्थितांनी टाळ्यांच्या कडकडाटाने त्याचे अभिनंदन केले.

या सर्वांपेक्षा या उत्सवातील महत्त्वाची गोष्ट म्हणजे सावरकरांची ' हिंदूंतील जातिभेद ' या विषयावर झालेली व्याख्याने ही होय. हिंदु जातीच्या सध्याच्या दुबळेपणाला, विस्कळीतपणाला हिंदूंतील जातिभेद हे एक अत्यंत महत्त्वाचे कारण आहे असे त्यांचे पूर्ण विचाराअंती ठाम मत बनले होते. एके काळी हा जातिभेद हिंदु जातीला क्वचित उपकारक असेलही पण हिंदुसमाजातील सध्या रूढ असलेला जातीभेद हा कोणत्याहि दृष्टीने समर्थनीय तर नाहीच नाही पण हानिकारक निश्चितपणे आहे असे त्यांचे मत होते

हिंदु समाजाच्या सामर्थ्याला खच्ची करून टाकणाऱ्या बहुतेक सर्व दुष्ट रूढींचे मूळ या जन्मजात जातिभेदात आहे अशी त्यांची ठाम धारणा होती आणि म्हणूनच जातिभेदाच्या उच्छेदनाचे आंदोलन हाती घेण्याचे त्यांनी ठरविले व तसे उत्सवाच्या समारोपाच्या दिवशी प्रचंड मिरवणुकीसमोर घोषित केले.

## सात पायांचा प्राणी

सावरकरांनी कोणतीही चळवळ हाती घेतली म्हणजे लेखन, भाषण आणि प्रत्यक्ष कृति या मार्गाने सतत ते त्या आंदोलनाचा पाठपुरावा करीत असत. निष्क्रिय वाचाळपणा त्यांना कधीच पसंत नसे.

जातिभेद-उच्छेदनाचे आंदोलन हाती घेण्याचे ठरविल्यावर त्यांनी आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे जातीभेदावर चौफेर हल्ले चढविण्यास सुरुवात केली. प्रचलित जातिभेदाचे अनिष्टत्व सिद्ध करण्यासाठी त्यांनी 'केसरी' मधून 'जातिभेदाचे दुष्टनिष्ठत्व' या मथळ्याखाली लेखमाला लिहिली व या प्रश्नाला महाराष्ट्रात सार्वत्रिक चर्चेला चालना दिली. जातिभेदाचे अनिष्टत्व सिद्ध करणारी त्यांची ७ मते रत्नागिरीत भारंभार होत होती. प्रचलित जातिभेदाचा

अनिष्टपणा मुख्यतः तरुणांच्या मनावर बिंबला पाहिजे म्हणून रत्नागिरीतील तरुणांचे 'हिंदु मंडळ' स्थापन करून त्यात दर आठवड्याला ते जन्मजात जातिभेदाचे अनिष्टत्व सिद्ध करण्यासाठी चर्चा करीत असत. या चर्चेचा मुख्य गाभा असा असे– जातिभेद हा सप्तपाद प्राणी आहे. ते सात पाय म्हणजे वेदोक्तबंदी, सिंधुबंदी, शुद्धीबंदी, व्यवसायबंदी, स्पर्शबंदी, रोटीबंदी व बेटीबंदी. या सात पायांपैकी सिंधुबंदी, शुद्धीबंदी, व्यवसायबंदी हे तीन पाय कालौघात बरेचसे कमकुवत झाले आहेतच. आता उरलेले चार पाय, म्हणजे वेदोक्तबंदी, स्पर्शबंदी, रोटीबंदी व बेटीबंदी हे चार पाय विशेषतः स्पर्शबंदी, रोटीबंदी व बेटीबंदी हे तीन पाय आपण तोडले म्हणजे जातिभेदरूपी सप्तपाद प्राणी खाली कोसळलाच म्हणून समजा. जातिभेद-निर्मूलनासाठी सहभोजने झाली पाहिजेत आणि ती सुद्धा 'जातिभेदोच्छेदनार्थ अखिल हिंदु सहभोजन करिष्ये' असा संकल्प सोडून.

जन्मजात जातिभेदामुळे, जातिजातीतील उच्चनीच जन्मजात भेदामुळे हिंदु समाजात गुणाला प्राधान्य न मिळता जातीला प्राधान्य दिले जाते व त्यामुळेच कमी समजल्या जाणाऱ्या जातीतील अनेक गुणी माणसांचा हिंदु समाजाला व्हावा तसा उपयोग होत नाही. अमुक एका जातीत जन्म घेतल्यामुळे मनुष्य उच्च किंवा नीच ठरतो हे सर्वस्वी चुकीचे आहे. हिंदूतील कोणीहि मनुष्य जन्मतःच उच्च नाही किंवा नीच नाही. कर्तृत्वाने तो थोर आहे की नाही हे ठरले पाहिजे हे सूत्र नेहमी ते तरुणांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करीत.

## पहिले सहभोजन

तरुण हिंदु मंडळाच्या वाढदिवशी सहभोजन करून जन्मजात जातिभेदाच्या उच्छेदनाचे सूतोवाच करण्याचे ठरले. कै. डॉ. शिंदे यांचे घर त्यासाठी मुक्रर करण्यात आले. पण डॉ. शिंद्यांच्या आप्तेष्टांनी त्याला जबरदस्त विरोध केला व म्हणून त्यांचे घर सहभोजनाच्या कार्यक्रमासाठी मिळेना. सहभोजनाचे अन्न शिजविण्यासाठी स्वयंपाकी मिळेना. शेवटी आपाच्या नाट्यगृहात सहभोजनाची जागा ठरवावी लागली.

सावरकरांनी या वेळी अत्यंत परिणामकारक भाषण करून, जन्मजात जातीभेदाचा उच्छेद ही हिंदु समाजोद्धाराची प्रेरणा या व अशाच पुढे होणाऱ्या सहभोजनामागे असल्याचे स्पष्ट केले.

१९ सप्टेंबर १९३० रोजी हे पहिले सहभोजन रत्नागिरीला झाले. या सहभोजन समारंभामुळे रत्नागिरीच नव्हे तर महाराष्ट्रभर खूप खळबळ उडाली. परंतु सावरकरांनी कोणाच्याही विरोधाची पर्वा न करता आपले समाजक्रान्तीचे आंदोलन मोठ्या निर्धाराने चालू ठेवले.

# प्रखर विरोधाला न जुमानता सुधारणांचा आग्रही पुरस्कार

## आमच्यावर बहिष्कार

' पूर्वास्पृश्यांसह सर्व हिंदुबांधवांना आपल्या देवालयातून समान अधिकार असले पाहिजेत ! इतकेच काय पण कार्यक्षम असेल तर पूर्वास्पृश्यहि देवालयाचा पुजारी असू शकेल, मग इतर सवर्ण हिंदु असू शकतीलच, ' हे सावरकरांचे विचार श्रीपतितपावन मंदिराच्या पायाभरणीचा समारंभ झाला त्यावेळी संकल्पित देवालयाच्या व्यवस्थेबाबतची जी नियमावलि सावरकरांनी जाहीर सभेत वाचून दाखविली त्यावरून रत्नागिरीच्या जनतेला माहीत झाले होते.

रूढिप्रिय समाज त्यामुळे खूप अस्वस्थ झाला होता व तात्यांना ' धर्मबुडवे, ' ' सबगोलंकारी ' म्हणू लागला होता. त्यात आता जातिभेद-उच्छेदनाचा संकल्प सोडून सहभोजने होऊ लागल्यामुळे आगीत तेल ओतल्याप्रमाणे स्थिती झाली होती. देवालयप्रवेशाच्या जोरदार आंदोलनामुळे अनुयायी म्हणविणारे कित्येक लोक तात्यांना सोडून गेले होते. आता या सहभोजनांमुळे आणखीहि कित्येक लोक त्यांच्यापासून दूर झाले. सावरकरांच्या ज्वलंतजहाल सामाजिक आंदोलनाची जहरता सामान्य लोकांना झेपण्यासारखी नव्हती. तथापि ! धर्ये जनहित श्रेयं केवला न जनस्तुति ' या ध्येयाने प्रेरित झालेल्या सावरकरांनी त्याची फिकीर केली नाही.

या जात्युच्छेदक सहभोजनात भाग घेणाऱ्या सहभोजकांच्या कुटुंबातील मरणकाली तट पडले. त्या कुटुंबावर भिक्षुकवर्गाकडून मुख्यतः व इतर समाजाकडूनहि बहिष्कार टाकले गेले. आप्तस्वकीयांकडूनहि ते बहिष्कारिले गेले व त्यांची अडवणूक करण्यात येऊ लागली.

या सामाजिक बहिष्काराची झळ आमच्या घराला इतर सहभोजकांप्रमाणे चांगलीच लागली. आम्ही चारहि बंधूंनी सहभोजनांत भाग घेतला असल्यामुळे आमच्या वडिलांच्या अनेक स्नेह्यांनी आमचे घर वर्ज्य केले होते. तसे जवळ दूरच्या आप्तेष्टांनीही आमचे घर वर्ज केले होते.

## कीरांची माघार तर सावरकरांचा निर्धार

याप्रमाणे आत्युच्छेदक सहभोजनांच्या व सहभोजकांवरील सनातनी मंडळींच्या बहिष्काराचा धुमाकूळ सुरू असतानाच श्रीपतितपावन मंदिराचा उद्घाटन समारंभ झाला. या समारंभासाठी अनेक पुढाऱ्यांना व शास्त्रीपंडितांना आमंत्रणे देण्यात आली होती. 'केवळ अस्पृश्यतेचे आमूलाग्र उच्चाटन करण्यासाठी नव्हे तर ज्या काही निरर्थक भेदाभेदांमुळे आपल्या अखिल हिंदु समाजाची एकता, एकजिनसीपणा भंगतो त्या इतर अनेक रूढींचेही निर्मूलन करण्याचा उपक्रम या संस्थेत होणार आहे' असे स्पष्टपणे सावरकरांनी 'केसरी'त लिहिले होते.

उद्घाटन समारंभासाठी डॉ. कुर्तकोटी, डॉ. सावरकर, डॉ. वेलकर, लालजी पेंडसे, इत्यादि मुंबईची पुढारी मंडळी श्री. राजभोज, पुणे, श्री. गायकवाड, नाशिक, सुभेदार घाटगे, पुणे इत्यादि पूर्वास्पृश्य पुढारी, आमच्या जिल्ह्यातील श्री. मसुरकर महाराज, श्रीभक्त नवरे महाराज, श्री. बोवडे महाराज, संत पाचलेगांवकर इत्यादि संत मंडळी नाशिकातून काही शुद्धीकृत नवहिंदूसह, श्री. खांडे, 'केसरी'ने या समारंभासाठी खास पाठविलेले प्रतिनिधी श्री. शिंदे इत्यादि तीनशे चारशे मंडळी बाहेरगावाहून आली होती.

उद्घाटन समारंभाचा कार्यक्रम तीन दिवसांचा होता. २१ फेब्रुवारी १९३१ रोजी देवप्रतिष्ठा, दिनांक २२ रोजी श्रीपतितपावनाच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा व दुपारी १२ वाजून ३९ मिनिटांनी मूर्तीची स्थापना व दि. २३ रोजी अवभृतस्नान; याशिवाय व्याख्याने, कीर्तने, मेळे इत्यादि अनेक कार्यक्रम आखण्यात आले होते.

काशीचे आणि नाशिकचे शास्त्रीपंडित समारंभाच्या अगोदर एक दिवस रत्नागिरीत येऊन दाखल झाले होते. त्यांना सावरकरांनी होणाऱ्या समारंभाची धार्मिक विधींची कल्पना दिली. सर्व धार्मिक विधी कीर शेटजींच्या हस्ते वेदोक्त पद्धतीने व्हावयास हवेत असेहि त्यांनी स्पष्टपणे सांगितले. 'कीरशेटजी हे भंडारी असल्यामुळे वेदोक्त पद्धतीने आम्ही धार्मिक विधी करणार नाही' असे या शास्त्रीपंडितांनी सांगितले; तेव्हा तात्या एका बाजूला आणि शास्त्रीपंडित दुसऱ्या बाजूला या पद्धतीने दोन दिवस शास्त्रार्थ चालला होता.



शास्त्री पंडितांनी वेदोक्ताचे अधिकार ब्राह्मणेतरांना नसल्याचे धर्मग्रंथातील काही उतारे आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ आणले तर त्यांच्या विधानांना छेद देणारे उतारे सावरकरांनी धर्मग्रंथातूनच काढून दाखविले, समाजाची धारणा करील तोच धर्म. मनुस्मृतीच्या निकषावर घासले असता ज्याला ब्राह्मण म्हणता येईल असे कितीसे लोक उरले आहेत इत्यादि युक्तिवादहि सावरकरांनी केला. परंतु शब्द-प्रामाण्य मानणाऱ्या शास्त्री पंडितांची समजूत काही केल्या पटेना आणि ते कीरशेटजींच्या हस्ते वेदोक्त पद्धतीने धर्मविधी करण्यास तयार होईनात.

शास्त्रार्थाचा हा वादविवाद दिनांक २० रोजी सायंकाळी सुमारे अडीच तास व दि. २१ रोजी सकाळी सुमारे दोन तास चालला होता. सावरकरांचे धर्मग्रंथांचे वाचन किती दांडगे आहे हे त्यावेळी सर्वांच्या प्रत्ययास आले. डॉ. कुर्तकोटी या सर्व चर्चेच्यावेळी उपस्थित होते व त्यांनीही श्री. कीरशेटजींच्या हस्ते वेदोक्त पद्धतीने धार्मिक विधी व्हावयास हरकत नाही असा निर्णय दिला. तरीही शास्त्रीपंडितांना ते मान्य झाले नाही.

या वादविवादास २१ फेब्रुवारीच्या सकाळचे बारा वाजले. त्याच दिवशी दुपारी बाराच्या आधी देवप्रतिष्ठेच्या पूर्वविधीचा मुहूर्त ठेवलेला होता. तेव्हा देवप्रतिष्ठेचा मुहूर्त चुकू नये म्हणून भाविक वृत्तीने कीर शेटजी डोळ्यांत आसवे आणून तात्यांना म्हणाले, "पुराणोक्त तर पुराणोक्त, पण देव प्रतिष्ठा ठरलेल्या वेळी होऊ द्या."

त्यावर सावरकर तत्काळ म्हणाले, "शेटजी, देऊळ आपले, आपण धनी; तेव्हा समारंभ आपण करालच. पण प्रत्येक हिंदूला वेदोक्ताचा अधिकार आहे या तत्त्वाला आपण सोडणार असाल तर आपण मलाहि सोडल्यासारखेच होईल. जुनी देवळे थोडी नाहीत. तत्त्वाचे अधिष्ठान म्हणून हे नवे देऊळ हवे आहे. ते साधत नसेल तर आपण मलाहि तोडावे. पण जर आपण तत्त्वास सोडणार नसाल तर याहि परिस्थितीत समारंभ मी पार पाडीन. पण आमच्या अखिल हिंदु-स्मृतीच्या आधारे, पूर्वास्पृश्यासह अखिल हिंदूंचा जो हजारोंचा समुदाय आज आलेला आहे त्या हजारो हिंदूंच्या हस्ते देवमूर्ति उचलून 'जय देवा' असा घोष करून आम्ही ती मूर्ति स्थापणार. हाच आमचा विधी; 'हिंदुधर्म की जय' हे हजारो कंठातून निघणारे जयघोष हाच आमचा वेदघोष आणि 'यावेहि विद्यते देवो' हाच आमचा शास्त्राधार."

तात्यांच्या या तळमळीच्या आणि निर्धारयुक्त बोलण्याने कीरशेटजींना आनंद व समाधान वाटले व ते उत्साहाने म्हणाले, "ठीक आहे, मी तत्त्व सोडीत नाही आणि सावरकरांना तर नाहीच नाही."

शेवटी मसूरकरमहाराजांच्या आश्रमातील वे. शा. सं. विष्णुशास्त्री मोडक यांनी महाराजांच्या आज्ञेनुसार कीरशेटजींच्या हस्ते वेदोक्त विधीने देव प्रतिष्ठादिक सारे धर्मविधि यथासांग पार पाडले आणि दिनांक २२ फेब्रुवारीला श्रीपतितपावनाच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा श्रीशंकराचार्यांच्या हस्ते ' हिंदु धर्म की जय ' च्या गजरामध्ये बारोळीत करण्यात आली. या समारंभात पुण्याचे श्री. राजभोज यांनी शंकराचार्यांची पाद्यपूजा केली.

दि. २३ रोजी अन्नसंतर्पणाचा कार्यक्रम होता. या अन्नसंतर्पणाच्या कार्यक्रमात ' सावरकरांचे पाखंडी सहभोजन होता कामा नये ' असा आग्रह अनेक सनातनीशिवरोबरच श्रीमसूरकरमहाराज, संत पाचलेगावकरमहाराज व स्वतः डॉ. कुर्तकोटी यांनी कीरशेटजींकडे धरला. ' सहभोजन कन्यकाजात जातिउच्छेदन ही आंदोलनें आचाराधीनपणाची व पाखंडी आहेत. सावरकरांच्या या आंदोलनाला आमची मुळीच संमति नाही ' असे आग्रहपूर्ण ते सांगू लागले.

स्वतः कीरशेटजी विनयशील व मनमिळाऊ स्वभावाचे. त्यांचा स्वाभाविक कल संतमहंत मंडळींकडे, स्वजातीय वगैरे मुळीच त्यांनी वर्ज केलेले. तेव्हा सहभोजनाचा कार्यक्रम त्यांना मानवणारा नव्हता. त्यातच सगळ्या सनातनी लोकांनी व संतमहंत मंडळींनी सहभोजन न होण्याचा आग्रह धरलेला. तेव्हा कीरशेटजींनी अन्नसंतर्पणांत सहभोजन होऊं नये म्हणून तात्यांना विनविले.

पण या अन्नसंतर्पणातील जात्युच्छेदक सहभोजनाचा कार्यक्रम तात्या रद्द करणे शक्यच नव्हते. या समारंभासाठी दूरदूरच्या ठिकाणांहून आलेल्या लोकांना रत्नागिरीतील समाजक्रांतीने प्रात्यक्षिक दाखविण्याची आलेली संधी गमविणें तात्यांसारख्या आग्रही प्रचारकाला मानणारें नव्हते.

ते कीरशेटजींना म्हणाले, " तुम्ही अन्नसंतर्पण जुन्या पद्धतीने म्हणजे भिन्नभिन्न जातींच्या निरनिराळ्या पंक्ती वाढून करणार ना ? तुमच्या शब्दसाठीच केवळ । ते मला अमान्य आहे तरीहि मी त्याला संमति देतो. पण मग आम्हा जात्युच्छेदक सहभोजकांसाठीहि तुम्हाकडे एक अत्यंत न्याय्य अशी मागणी आहे. अन्नसंतर्पणात सहभोजन करूं इच्छिणाऱ्यांची एक स्वतंत्र पंगत ठेवण्याची व्यवस्था करा. ज्याला ज्या पंक्तीत बसावयाचे असेल तो बसेल. सनातन्यांच्या जातवार पंक्तींच्या आम्ही सहभोजन विरोध करीत नाही. त्यांनी आमच्या पंक्तीला विरोध करूं नये. त्यांचा प्रामाणिकपणा आम्ही मानावा आमचा त्यांनी. "

सावरकरांच्या या बिनतोड युक्तिवादापुढे सनातनी काय बोलणार ! अखेर कीरशेटजींनी सहभोजकांच्या स्वतंत्र पंक्तीला अन्नसंतर्पणांत परवानगी दिली आणि रत्नागिरीतील सुमारे तीनशे लोक व बाहेरगावचे आलेले सुमारे शंभर लोक या ' पाखंड ' पंक्तीत जेवले.



## सावरकर हेच खरे शंकराचार्य !

२४ फेब्रुवारीला दुसरी आगळी महत्त्वाचा कार्यक्रम झाला. तो म्हणजे पतितपावन मंदिराच्या आवारातील विस्तीर्ण सभामंडपात दुसरी मुंबई इलाखा अस्पृश्यता निवारक परिषदेचे भरलेले मह्त्वाचे अधिवेशन हा होय. या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून तात्यांचीच निवड करण्यात आली होती.

या अधिवेशनांत पतितपावनाच्या उद्घाटन-समारंभासाठी आलेले पुणे, मुंबई, नाशिक इत्यादि ठिकाणचे पूर्वास्पृश्य पुढारी उपस्थित होतेच. पण रत्नागिरी जिल्ह्यांतूनहि शंभर-सव्वाशे लोक आले होते. त्या शेकडो पूर्वास्पृश्यांनी तात्यांचा अतिशय गौरव केला. सुभेदार घाटगे ( पुणे ) यांनी तर सावरकरांना ' आमचे खरे शंकराचार्य ' अशी पदवी दिली. या अधिवेशनात कीरशेटजींनी श्रीपतितपावन मंदिराची निर्मिति करून अस्पृश्योद्धाराबाबत केलेल्या कामगिरीबद्दल त्यांचे आभार, नाशिक येथील रामपंदिर सत्याग्रहाला पाठिंबा व गोमांतकांतील शुद्धीबद्दल श्री. मसूरकरमहाराज व त्यांना आश्रम यांचे अभिनंदन इत्यादि ठराव संमत झाले.

१९३१ साली शिरगणति आली. तीमध्ये आपली निरनिराळी जात न सांगता सर्व हिंदूंनी आपली जातहि " हिंदु " म्हणूनच नोंदवावी अशी रत्नागिरी हिंदुसभेने चळवळ केली व ज्या कोणाला आपली जात ' हिंदु ' अशीच नोंदवायची असेल त्याला तशी परवानगी असावी अशी मागणी सरकारकडे केली. प्रथम ही मागणी नाकारण्यात आली. तेव्हा हिंदु सभेने अर्ज करून ' आम्ही आमची जात हिंदु व धर्म हिंदु एवढेच मानतो. ब्राह्मण, सुतार, शिंपी वगैरे प्रकार मानीत नाही ; तेव्हा आम्ही आमची जात ' हिंदु म्हणूनच लावणार ' असे निर्वाणीचे पत्र लिहिले तेव्हा जात या सदरामध्ये कोणी आपल्याला ' हिंदु ' म्हणूनच नोंदवू इच्छित असेल तर तशी नोंद करावी असा सरकारी आदेश झाला.

' सारे हिंदुमात्र एक ' ही सावरकरांची भूमिका या आदेशामुळे अप्रत्यक्षतः का होईना, पण सरकारकडून मंजूर झाली.

# जातीभेदाच्या निर्मूलनासाठीं महिला-वर्गांचें सहभोजन

## चाळीस वर्षांनंतर पटेल !

श्रीपतितपावन मंदिर रत्नागिरींतील इतर देवालयाप्रमाणेंच जनतेच्या वर्दळीचें व्हावें म्हणून सावरकरांनी प्रारंभापासून पद्धतशीर प्रयत्न केले. जे सुधारक होते त्यांना रोज सकाळ-संध्याकाळ देवदर्शनाला येण्याचा दंडक घातला. दर एकादशीला विठोबाची देऊन निरनिराळ्या भजनी मंडळींनी या मंदिरामध्ये भजनें करण्याचा कार्यक्रम सुरू केला.

पहिले चार-पांच महिने देवालयांत देवदर्शनार्थ येणाऱ्या आबाल-वृद्ध स्त्री पुरुषांची स्वतंत्रपणें टिपणें ठेवली. जुन्या देवालयांतून साजरे होणारे गोकुळअष्टमी, कार्तिकस्वारी वगैरे उत्सव याहि देवळांत सुरू केले. कार्तिक महिन्याच्या पहिल्या पंधरवड्यांत बहुतेक सर्व देवालयांतून देवमूर्तीला निरनिराळी रूपें देतात व तीं पाहण्यासाठीं आबाल-वृद्ध नागरिक गर्दी करीत असतात म्हणून श्रीपतितपावन मंदिरांतहि अशा प्रकारची रूपें दाखविण्याची सावरकरांनी व्यवस्था केली.

श्रीपतितपावन मंदिर जनतेमध्ये रुळण्यासाठीं मोठा मोका सावरकरांना गणेशोत्सवामुळें मिळाला. मागील वर्षीचा गणेशोत्सव याच आवारांत व मंदिरांत झाला होता, पण त्यावेळी देवालयांत मूर्तीची स्थापना झालेली नव्हती. ती १९३१ च्या फेब्रुवारी महिन्यांत झाली. म्हणून मूर्तीची स्थापना झाल्यानंतर श्रीपतितपावन मंदिरांत अखिल हिंदूंच्या वतीनें होणारा ' अखिल हिंदु गणेशोत्सव ' हा १९३१ सालांतीलच पहिला म्हटला पाहिजे.

अखिल हिंदु गणेशोत्सवाचें जें कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें त्यांत नेमस्त सुधारक ( जे सावरकरांच्या देवालय-प्रवेशापर्यंतच्या सामाजिक आंदोल-



नाला अनुकूल, पण पुढें जात्युच्छेदक चळवळीला प्रतिकूल होते ते ) व जात्युच्छेदक जहाल सुधारक या दोघांचाहि समावेश होता. त्यामुळें अखिल हिंदु गणेशोत्सवाचा कार्यक्रम ठरवितांना या नेमस्त सुधारकांनी उत्सवांत सहभोजन होतां कामा नये असा आग्रह धरिला. त्यामुळें या प्रश्नावर खूप सवाजगी झाली.

शेवटीं सावरकरांनी अशी तोड काढली कीं, श्रीपतितपावनाच्या उद्घाटन समारंभाच्या वेळेप्रमाणें उत्सवांत अन्न-संतर्पण हा कार्यक्रम असावा त्या वेळीं ज्याला त्याला आपापल्या मताप्रमाणें पंक्ति करण्याचा अधिकार असावा. सहभोजकांनाहि आपली पंगत करण्याचा अधिकार राहीलच. दुसरें म्हणजे उत्सवांत दोन्ही पक्षांची मतें व्याख्यानांतून मांडण्याची मोकळीक असावी. इतकेंच काय पण ' जातिभेद असावा ' अशा मताच्या पुढाऱ्यांनाहि या उत्सवांत नेमस्त सुधारकांनी आमंत्रण दिल्यास आणि त्याप्रमाणें कोणी आल्यास त्याचा व्यय गणेशोत्सव मंडळानें करावा. सावरकरांची ही तडजोड इतकी वाजवी होती कीं, नेमस्त सुधारकांना ती मान्य करणें भागच पडलें.

या तडजोडीनुसार एक दिवस तात्यांनी ' जात्युच्छेदक सहभोजनांची इष्टता ' या विषयावर सुमारें दीड-सव्वा तास भाषण केलें. त्यांच्या भाषणाचा मुख्य आशय असा कीं, ' वेदकालीं जातिभेद नव्हता. वर्णभेद होता. मनुष्याचे आचार विचार आणि धंदे यावर तो ठरविला जात असे. ज्या घराण्यांत जो आचार-विचार किंवा धंदा असे तोच सामान्यतः पुढेंहि चाले आणि त्यामुळें हे वर्णहि जन्मानें ठरूं लागले. पुढें या वर्णांतील लोकहि निरनिराळे धंदे करूं लागले, त्यांचे आचार-विचारहि निरनिराळे होऊं लागले. तेव्हां चार वर्णांतहि अनेक भेद झाले व त्यास जाती म्हणून ओळखण्यांत येऊं लागलें. पुढें ज्या जातींत जो जन्माला आला तो त्या जातीचा म्हणून गणला जाऊं लागला. मग त्याचे आचार-विचार कसेहि असोत. मनुस्मृतीच्या आधारें आज किती लोक स्वतःला ब्राह्मण म्हणवूं शकतील ? या जन्मजात जातिभेदाचें मुख्य गमक म्हणजे मुख्यतः इतर जातींशीं रोटीबंदी व बेटीबंदी. त्यामुळें आपल्या हिंदु समाजांत अनेक भेद पडले, आपापसांत हेवेदावे निर्माण झाले आणि एकजिनसी आणि सामर्थ्य-संपन्न हिंदु समाज विस्कळीत आणि दुबळा झाला. तो जर परत एकजिनसी आणि सामर्थ्यसंपन्न व्हावयास पाहिजे असेल तर त्यांच्यांतील हे फुटकामी, घातक आणि आज तरी कोणत्याहि दृष्टीनें समर्थन न करतां येणारे जन्मजात जातिभेद नष्ट झालेच पाहिजेत. ते आपोआप नष्ट होत नसतील तर बुद्धया नष्ट केले पाहिजेत.'

ते पुढें म्हणाले, " श्रुति, स्मृति, पुराणें कांहीहि म्हणोत, सद्यःस्थितींत जर हे जातिभेद हिंदु समाजाला घातक ठरत असतील तर श्रुति, स्मृति, पुराणांत कांहीहि सांगितलेलें असलें तरी तें बाजूला सारून समाजानें हे जातिभेद नष्ट

# रत्नागिरीतील समाजक्रांतीचा कर्मवीर शिंदे यांनी केलेला गौरव

## भाई माधवराव बागलांची खंत

१९२४ ते १९३१ ही सात वर्षे सावरकरांनी रत्नागिरीतील अस्पृश्यता-निवारण, अस्पृश्यांचा देवालय-प्रवेश, जातिभेद-निर्मूलनाचे आंदोलन इत्यादि समाज-सुधारणेचे जे मूलगामी उपक्रम सुरू केले ते समाजात रुजावे, एतदर्थ त्यांनी रत्नागिरीच्या स्थानबद्धतेतील आपली पुढील पाच वर्षे घालविली. सिंधुबंदी व्यवसायबंदी, स्पर्शबंदी, वेदोक्तबंदी, शुद्धीबंदी, रोटीबंदी व बेटीबंदी या सात स्वदेशी शृंखलांनी जखडला गेलेला हिंदु समाज त्या बेड्या तोडून विमुक्त व्हावा परिणामतः बलशाली व्हावा म्हणून त्यांनी पुढील पाच वर्षांत जमेल ते ते सर्व प्रयत्न केले. सिंधुबंदी नि व्यवसायबंदी काळोघात बहुतेकच जवळजवळ संपली होती. पण उरलेल्या पाच बंधनांचे प्रयत्नपूर्वक निर्मूलन करणे आवश्यक होते आणि त्याच्यासाठी सावरकरांनी रत्नागिरीतील आपला उर्वरित काळ व्यतीत केला.

१९३२ च्या अखिल हिंदु गणेशोत्सवामध्ये याच हेतूने प्रेरित होऊन त्यांनी [illegible]बुवांचे कीर्तन, विद्यावाचस्पति वाळावलकर यांच्या पौरोहित्याखाली 'अखिल-हिंदु-यज्ञ', सत्यशोधक समाजाचे कोल्हापुरातील एक प्रमुख पुढारी भाई माधवराव बागल यांचे अस्पृश्यता निर्मूलनावर व्याख्यान व कोल्हापूरचे क्षात्र-जगद्गुरु यांच्या अध्यक्षतेखाली पुरुषांचे सहभोजन इत्यादि समाजक्रांतीचे कार्यक्रम झाले. क्षात्र-जगद्गुरु व भाई माधवराव बागल हे दोघेही रत्नागिरीतील सावरकर पुरस्कृत समाजक्रांती पाहून अत्यंत प्रभावित झाले होते.

भाई माधवराव बागलांनी 'येथे ( रत्नागिरीत ) आल्यापासून इतकी क्रांति दिसते आहे की, ती पाहून मी दिङ्मूढ होऊन गेलो आहे. पुण्या-मुंबईकडे



स्त्रियांच्या ज्या सहभोजनाला पाच-सहा पर्यंतसुद्धा संख्या मोठ्या कष्टाने जमवावी लागते. कोल्हापुरात तर ते आम्हाला अद्यापि शक्य झालेले नाही, तेच सहभोजन येथे शेकडो स्त्रियांचे होऊ शकते. या सर्व समाजक्रांतीचे श्रेय मी तात्यारावांना देतो. असला प्रभावी पुरुष जर आम्हांला देशावर मिळाला असता तर आम्ही त्याला डोक्यावर घेऊन नाचलो असतो," असे उद्गार व्याख्यानाला प्रारंभ करतांना त्यांनी काढले.

## अखिल हिंदू उपाहारगृह !

वैद्यकशास्त्रदृष्ट्या योग्य असे अन्न कुणीहि कुठेहि सेवन केले तरी मनुष्य बाटत नाही रोटीबंदी तोडल्याने तो पतित होत नाही, हे तत्त्व समाजाच्या मनी ठसविण्यासाठी सावरकरांनी श्रीपतितपावन मंदिराचे आवारात 'अखिल हिंदु उपाहारगृह' सुरू केले. या उपाहारगृहाचे संचालक होते "भाई बंध गजाननराव दामले. रोज सायंकाळी सहाच्या सुमारास सावरकर या उपाहारगृहात येऊन बसत.

आपल्याला भेटण्यास येणाऱ्या अनेक परस्थ लोकांना ते याच ठिकाणी भेटत. त्यांना या उपाहारगृहाची माहिती देत आणि सांगत "या उपाहारगृहात सर्व हिंदूना समानतेने वागविले जाते. रोटीबंदीची बेडी कल्पना तोडण्यासाठीच या उपाहारगृहाचा जन्म आहे. तेव्हा आपण या उपाहारगृहात काही खावे व चहा घ्यावा व आमच्या रोटीबंदी तोडण्याच्या प्रयत्नाला हातभार लावावा. मात्र एक ध्यानात असू द्या की, आपण या ठिकाणी काही खाल्ले किंवा चहा घेतलात तर आपले नाव वर्तमानपत्रात प्रसिद्ध होईल."

सावरकरांनी असे टाकल्यावर तो अव्हेर करणे थोडे कठीणच! त्यामुळे अनेक लोक या उपाहारगृहात खाऊन जात आणि सावरकर त्यांच्या नावाची काळजीपूर्वक नोंद करून दर महिन्याला वर्तमानपत्रातून प्रसिद्ध करीत. परिणाम हा होई की, अशा सुधारकांवर बहिष्कार घालणाऱ्या सनातनी लोकांची [illegible] ठरे. 'सर्वांचे स्थान हृदय, पोट नव्हे' ही सावरकर-सूक्ति याच अनुषंगाने निर्माण झाली.

## अस्पृश्यांना जानवी !

त्या काळी अस्पृश्यांना जानवी देण्याचे समारंभ डॉ. बाबासाहेब आंबेडकर करवून आणीत असत. श्रीपतितपावनाच्या स्थापनेनंतर दोन-तीन वर्षे सावरकर श्रीपतितपावन मंदिरात 'अखिल हिंदु श्रावणी कार्यक्रम' हेतुतः करवून आणीत.

पौरोहित्य करण्यास श्रीपतितपावनाचे पुजारी श्री. शंकरभटजी जोशी असत एका श्रावणीला त्यांनी मुद्दाम कोल्हापुराहून सत्यसमाजी पुरोहित आणविला व त्याच्या पौरोहित्याखाली श्रावणी साजरी केली

श्रावणी संपल्यानंतर ते तथाकथित अस्पृश्यांना व इतर समाजाला उद्देशून म्हणाले, " डॉ. आंबेडकरांच्या आणि तुमच्या मागणीप्रमाणे आता तुम्हांला आम्ही जानवी दिली आहेत. जानवे हे आमच्या पवित्रतेचे द्योतक मानले जाते म्हणजच त्याचे पावित्र्य रक्षिण्यासाठच तुमची राहणी तुम्ही सुधारली पाहिजे, स्वच्छतेने राहाण्याची सवय तुम्ही अंगी बाणली पाहिजे आणि महत्वाची गोष्ट ही की या जानव्याचे प्रामाणिकपणे तुम्ही रक्षण केले पाहिजे. हिंदु जातीवर कोठेहि आघात झाल्यास तिचे संरक्षण करण्यात, प्रसंगी प्रत्याघात करण्यास सदैव सिद्ध असले पाहिजे. केवळ ब्राह्मण घालतात म्हणून तुम्ही जानवी घालण्यांत कांहीच अर्थ नाही. "

## अस्पृश्यतेचा मृत्युदिन !

१९३३ सालच्या शिवरात्रीला रत्नागिरीतील जन्मजात अस्पृश्यतेचा मृत्युदिन पाळण्याचें रत्नागिरी हिंदुसभेने ठरविले. त्या 'दिना' साठी पुण्याच्या डिप्रेस्ड क्लास मिशनचे कर्मवीर शिंदे, दलित वर्गाचे पुढारी पां. ना. राजभोज मुंबईहून डॉ. सावरकर व श्री. पुण्पाला ( यांनी मुंबईतील हिंदु-मुस्लिम दंगलीत हिंदूंच्या रक्षणार्थ अमोल कामगिरी केली होती व त्यामुळे त्यांना सरकारी रोषावर खूप त्रास झाला होता. ) इत्यादि पुढारी मुद्दाम आले होते. श्रीपतितपावन मंदिरात त्यांची पहिली स्वागत-सभा झाली.

स्वागताला उत्तर देतांना कर्मवीर शिंदे म्हणाले, " अस्पृश्यता-निवारणार्थ रत्नागिरीने केलेली उत्कृष्ट कामगिरी प्रत्यक्ष पाहण्यासाठी मी येथे आलो असून अस्पृश्यता निवारणाच्या पुढे जाऊन जन्मजात जातिभेदाचाच उच्छेद करण्यासाठी आपण इतक्या निकराच्या छातीने झटत असलेले पाहून मला आश्चर्य वाटले. ही विलक्षण मनःक्रांती रत्नागिरीसारख्या पुराणप्रिय नगरांत झाली तरी कशी याचें इंगित मला या आंदोलनाच्या धुरंधर वीराकडून बॅ. सावरकरांकडून-समजून घ्यावयाचें आहे. "

महाशिवरात्रीच्या दिवशी सकाळी कर्मवीर शिंदे, श्री. राजभोज प्रभृति मंडळी मराठवाड्यांत, कांभारवाड्यांत आणि इतरत्रहि मुद्दाम पाहणी करून आली. दुपारी श्रीपतितपावन मंदिरात अस्पृश्यताराक्षसी राक्षसाचा पुतळा



जाळण्याचा कार्यक्रम हजारो लोकांसमक्ष होण्यापूर्वी सावरकरांचे अत्यंत प्रभावी भाषण झाले आणि ' हिंदु धर्म की जय ' च्या गगनभेदी गर्जनेत एका बाजूला ब्राह्मण आणि दुसऱ्या बाजूला भंगी अशा दोघांनी त्या पुतळ्याला आग लावली. पुतळा जळत असतां बँण्ड, ताशे, ढोल यांचे वादन व ' हिंदुधर्म की जय ' च्या गर्जना अखंड सुरू होत्या.

पुतळा-दहनानंतर एक प्रचंड मिरवणूक श्रीपतितपावनापासून निघाली ती दीड-दोन मैल लांब असलेल्या श्री. भागोजीशेटजींच्या भागेश्वर मंदिरांत आली तेथे दहा बारा हजार लोकांच्या उपस्थितीत मुख्य कार्यक्रमाला सुरुवात झाली.

" डोळे भरून देवास मला पाहु द्या. मला देवाचे दर्शन घेऊं द्या ! " या ध्रुपदाने सुरुवात असलेले एक पद्य प्रथम एका भंगी मुलाने तबला-पेटीच्या साथीने म्हटले. एका अस्पृश्य मुलाने यानंतर गीतेचा पंधरावा अध्याय म्हटला ; तोवर ज्या थोर पुरुषाच्या सक्रीय आणि भरीव साहाय्यामुळे रत्नागिरीतील समाज-क्रांतीचे कार्य आकार घेवू शकले त्या भागोजीशेठ कीरांना पंधरावे सद्याचे एक मानपत्र कर्मवीर शिंदे यांच्या हस्ते देण्यात आले. त्यावेळी कीरशेटजी विनम्रतेने म्हणाले " मी जें कांही केले ते देवाचे कार्य म्हणून केले. माझ्या हातून हिंदु समाजाची जी कांही सेवा घडते आहे ती आपण गोड करून घ्यावी आणि झालेल्या सुधारणा चिकाटीने सांभाळाव्या. सावरकर रत्नागिरीहून गेले तरी मागे पाऊल पडू देऊ नये. "

कर्मवीर शिंदे यांनी नंतर समारोपाचें अध्यक्षीय भाषण केले. अस्पृश्यता निवारणाच्या कार्यांत ज्यांनी आपले सगळे जीवन व्यतीत केले होते त्या महर्षि शिंदे यांना रत्नागिरीची प्रत्यक्ष पाहणी केल्यानंतर रत्नागिरीमधील समाज-क्रांतीच्या कार्याबद्दल काय वाटले याची यथार्थ कल्पना यावी म्हणून ते थोडे विस्ताराने येथे देत आहे

ते म्हणाले, " रत्नागिरीतील सामाजिक मतपरिवर्तनाची मी बारीक रीतीने पाहणी केली तीवरून मी निःशंकपणे असे सांगतो की, येथे घडत असलेली सामाजिक क्रांति खरोखरच अपूर्व आहे. सामाजिक सुधारणेचें काम मी जन्मभर करीत आलो आहे. ते इतकें कठीण आणि किचकट आहे की, मी देखील मधून मधून निरुत्साही होतो. पण असे हे किचकट काम अवघ्या सात वर्षात रत्नागिरीसारख्या सनातनी नगरात सावरकरांनी करून दाखविले. ही रत्नागिरी नगरी केवळ अस्पृश्यतेचेच उच्चाटन करून थांबली नाही तर ती जन्मजात जातिभेदाचेच उच्चाटन करण्यास बद्ध-परिकर झाली. तुम्ही अस्पृश्यांबरोबर सहभोजन, सहपूजन, इत्यादि सारे सामाजिक व्यवहार प्रकटपणे करीत असताना

मी पाहातो आहे. याचा मला इतका आनंद होत आहे की, हे दिवस पहायला मी जगलो हें बरें झालें असें मला वाटतें."

"कोणाची तोंडदेखली स्तुती करण्याची मला सवय नाही पण ज्या सावरकरांनी आपल्या स्थानबद्धतेच्या अवघ्या सात वर्षांत ही अपूर्व समाजक्रांती घडवून आणली त्या सावरकरांचा किती गौरव करूं असें मला झालें आहे. आज दोन दिवस तुम्ही हजारो नागरिक, विशेषतः तरुणपिढी त्यांच्यावर जो निःसीम विश्वास ठेवीत आहां तो मी पाहात आहे. पण तुमच्या सार्‍या तरुणांत 'खरा तरुण' जर मला कोणी दिसत असेल तर तो निधड्या छातीचा वीर सावरकरच होय.

"मला असें म्हटल्यावांचून राहावत नाही की, बरें झालें त्यांना स्थानबद्ध करण्यात आलें. नाहींपेक्षा ही सामाजिक सेवा करण्यास सावरकरांना सवड मिळाली असती की नाही याची शंका वाटते. त्यांनी चालविलेली ही सामाजिक क्रांतीची यशस्वी चळवळ पाहून मला इतकें समाधान, इतका आनंद वाटतो आहे की, देवानें माझें उर्वरित आयुष्य त्यांनाच द्यावें अशी माझी प्रार्थना आहे. कारण माझे अपुरे राहिलेले हेतु कोणी पुरवील तर ते सावरकरच पुरवतील असें मला वाटत आहे. सरकारनें सावरकरांना या सामाजिक कार्यापुरतें तरी देशाच्या सर्व भागांत जायला मोकळें सोडावें अशी खटपट सर्व पूर्वास्पृश्यांच्या नि सुधारकांच्या वतीनें करावी असें श्री. गजमीन आणि मी ठरविलें आहे."

सावरकरांच्या रत्नागिरीतील समाजक्रांतीच्या कार्याला, अस्पृश्यता निवारण्याच्या कामीं आपली सर्व हयात व्यतीत करणाऱ्या महर्षी शिंदे यांनी दिलेलें हें शिफारसपत्र पुरेसें बोलकें आहे.

दर वर्षी श्रावण महिन्यांत रत्नागिरीच्या अनेक देवालयांतून भजनासाठी दोन-तीन तास भजन करूं शकणारे अनेक भजनी मेळे देवालयांत नेमलेल्या वेळीं क्रमाक्रमानें येत असतात व अशा पद्धतीनें अहोरात्र सात दिवस भजन सुरू राहातें. शेवटच्या दिवशी सर्व मेळे एकत्र जमून सप्ताहाचा समारोप करतात. सावरकरांनी हा नामसप्ताह सुद्धा श्रीपतितपावन मंदिरांत सुरू केला होता. त्यांत भाग घेणाऱ्या भजनी मंडळांत एक 'अखिल-हिंदु-भजनी' मेळा होता हें सांगणें नकोच.

## सावरकरांचे रत्नागिरीतील लेखन

सावरकरांचें सामाजिक क्रांतीचें आंदोलन प्रभावीपणें रत्नागिरीस सुरू असतांनाच इतरहि अनेक गोष्टी त्यांनी केल्या. त्या काळी स्वतंत्र असलेलें एकमेव हिंदु राष्ट्र जें नेपाळ, त्या राष्ट्रांतील लोकांत हिंदुधर्माबद्दल आणि भारतातील



हिंदूंबद्दल आत्मीयता उत्पन्न व्हावी, त्यांनी हिंदुसंघटन चळवळीचे पुरस्कर्ते बनावें, एतदर्थ सावरकरांनी लेख लिहिले, गुरखा लीगचे तत्कालीन अध्यक्ष ठाकूर चंदनसिंग यांना मुद्दाम रत्नागिरीस बोलावून त्यांच्याकडून हिंदु-हित-रक्षणाचें सार्वजनिकरीत्या आश्वासन घेतलें, इतकेंच नव्हे तर हिंदुमहासभेच्या प्रत्येक वार्षिक अधिवेशनाला गुरखा लीगच्या प्रतिनिधीला निमंत्रण जाईल अशी व्यवस्था केली.

सावरकरांच्या सर्व चळवळींकडे सरकार साशंक नजरेनें नेहमीच पाहात असे. अनेक वेळेला सावरकरांना याबद्दल स्पष्टीकरणें द्यावी लागली. सावरकरांच्या स्थानबद्धतेची मुदत दर खेपेला जी पांच पांच वर्षांनी वाढत गेली त्याला त्यांचे हिंदु-संघटनेचें आंदोलन हें एक महत्वाचें कारण होतें.

याच काळात त्यांनी 'उःशाप' आणि 'संन्यस्तखड्ग' ही नाटकें लिहीली. मोपल्यांच्या बंडावर आधारीत अशी 'मोपल्यांचे बंड अर्थात् मला काय त्याचें?' ही कादंबरी लिहीली. 'हिंदुपदपादशाही' हा इंग्रजी ग्रंथ लिहीला. लिपिशुद्धि व भाषाशुद्धि यांची आवश्यकता प्रतिपादन करणाऱ्या पुस्तिका लिहिल्या. 'दोन शब्दांत दोन संस्कृति', 'गाय, एक उपयुक्त पशु, माता नव्हे, देवता तर नव्हेच नव्हे!' 'हे केशवाच की बेशवाच?' इत्यादि रोखठोक बुद्धीवादावर आधारलेल्या निबंधांची 'किर्लोस्कर' मधून संततधार सुरू ठेविली आणि या सर्वांवर कळस म्हणजे महाराष्ट्र वाङ्मयांत अमर ठरलेली अशी 'माझी जन्मठेप' लिहिली.

## मी आद्यीय भटजी होतो–

सावरकरांच्या आत्युच्छेदक सहभोजनात ज्यांनी ज्यांनी भाग घेतला त्यांना त्यांना अनेक सामाजिक समस्यांना तोंड द्यावे लागलें. सनातनी लोकांनी त्यांची घरें बहिष्कृत केली. धार्मिक कार्यासाठी त्यांच्याकडे भिक्षुक वर्ग जाईना. अनेक आप्तेष्टांनी त्यांच्या घरी जाण्यायेण्याचेंच बंद केलें मग अन्नोदकाची गोष्ट कशाला? घराघरांत तट पडले, भांडणे वाढू लागली, पण तत्त्वनिष्ठेनें सहभोजक झालेल्या सुधारकांनी या सर्व सामाजिक संकटांना मोठ्या धैर्यानें तोंड दिलें. पुढें ४-६ वर्षांनी हा बहिष्कार शिथिल होत होत शेवटी समाप्त झाला.

या बहिष्काराबाबत एक मजेदार गोष्ट सांगण्यासारखी आहे. रत्नागिरीच्या "सत्यशोधक" पत्राचे संपादक कै. दत्तोपंत लिमये हे कट्टर सुधारक. त्यांनी सहभोजनांत भाग घेतलेला होता पण प्रायश्चित्त घेण्यास तयार नव्हते. म्हणून भिक्षुक मंडळी त्यांच्याकडे धार्मिक कार्यासाठी जात नसत. अशा स्थितीत त्यांच्या वडिलांच्या वर्षश्राद्ध तिथी आली. भिक्षुक त्यांच्याकडे जात ना! तेव्हां त्या

दिवशी तात्यांनी माझी श्राद्धीय भटजी म्हणून त्यांच्याकडे रवानगी केली. मला त्या दिवशी श्री. लिमये यांनी सव्वादोन रुपये दक्षिणा व मिष्टान्न भोजन दिले. तात्यांनी त्यापैकी एक रुपया हिंदुसभेला मदत म्हणून घेतलाच. ही घटना बहुधा १९३१ मधील असावी.

## सावरकर शिवाजीची भूमिका करण्यास सिद्ध

१९३२ च्या मे महिन्यात रत्नागिरी हिंदुसभेच्या मदतीसाठी 'आग्र्याहून सुटका' हे नाटक बसविण्याचे हिंदुसभेच्या स्वयंसेवक मंडळींनी ठरविले. या नाटकाचे दिग्दर्शन तात्या इतके प्रभावीपणे करीत की ते पाहून कसलेले नटहि तोंडात बोटे घालीत. जवळजवळ दोन महिने तालमी झाल्या. नाटकाच्या प्रयोगाचा दिनांक १०–१२ दिवसावर येऊन ठेपला. काय झाले कुणास ठाऊक पण शिवाजीची भूमिका करणारे श्री. चिंतोबाशेट खातू यांनी काम करण्यास एकाएकी ठाम नकार दिला. काय करावे हे कोणासच काही सुचेना. सावरकर हट्टास पेटले की ठरलेल्या दिवशी नाटक झालेच पाहिजे मग त्यासाठी कोणी नाही मिळाला तर मी शिवाजीची भूमिका करीन, या परिस्थितीत कोणीतरी शिवाजीच्या भूमिकेसाठी माझे नांव सुचविले. माझी शरीरयष्टी किरकोळ व चेहरा शिवाजीचे वळणावर नाही पण तात्यांच्या आग्रहामुळे मी ही भूमिका केली आणि सांगावयास अभिमान वाटतो की पडदावर, अभिनय व संवादफेक मी इतक्या चांगल्या तऱ्हेनें केल्या की श्रोतृगणांनी ४-६ वेळा टाळ्या देऊन माझ्या भूमिकेबद्दल पसंती दर्शविली. तात्यांनीहि माझी पाठ थोपटली. पण मी ही भूमिका करून "शिवाजी" हे ज्यांचे दैवत त्या सावरकरांची 'शिवाजी' ची भूमिका पहाण्याच्या देवदुर्लभ संधीला प्रेक्षकांना वंचित केले. पण आता हे समजून काय उपयोग?

सावरकरांच्या रत्नागिरीतील या स्थान बद्धतेच्या काळांतच महात्माजी रत्नागिरीस दौऱ्यावर आले असताना त्यांची नि तात्यांची 'अस्पृश्यता निवारण नि शुद्धि' या विषयावर उद्बोधक चर्चा झाली. परमपूज्य डॉ. हेडगेवार यांनी तर रत्नागिरीच्या त्यांच्या आरंभीच्या वास्तव्यात मुद्दाम रत्नागिरीस येऊन 'हिंदुसंघटने' बाबत महत्त्वपूर्ण चर्चा केली होती.

## सावकरांच्या शिरगांवांतील लिखाणाच्या मी प्रती करीत असे

आमच्या घरात तात्या राहात असतांना मी त्यांच्या बहुतेक सर्व लिखाणाच्या प्रती करीत असे. "हिंदुपदपादशाही" या त्यांच्या इंग्लिश पुस्तकाच्या पहिल्या ३५-४० पृष्ठांचे लिखाण,, वीर वामनराव जोशी यांचा 'नारायण' नावाचा



मुलगा सावरकर भक्त होता. तो १७-१८ वर्षांचा असताना अकाली कालवश झाला. त्याच्या मृत्यूबद्दल सावरकरांनी वीर वामनरावजींना पाठविलेले हृदय पिळवटून टाकणारे दुःखपत्र, गोमान्तकात धर्मवीर विनायक महाराज मसूरकर यांनी हजारों ख्रिश्चन गावड्यांची शुद्धी घडवून आणली त्यापूर्वी दोन-तीन दिवसच मुंबईच्या "श्रद्धानंद" मध्ये प्रसिद्ध झालेला 'गोमान्तकास विसरू नका कारण भारत म्हणजे केवळ ब्रिटीश भारत नव्हे" हा प्रदीर्घ लेख, इत्यादी त्यांच्या लिखाणाच्या प्रती मी केल्याबद्दल आजही मला स्मरते.

## योजनाबद्ध नि पद्धतशीर काम

सावरकरांचे कोणतेही काम योजनाबद्ध नि पद्धतशीर असे. त्या काळात मी माझे बंधु तात्या (तथा रामचंद्र) गजाननराव, नि नारायणराव, नाना बापट, भल्या पाटणकर, माळवी नि सावंत गुरुजी, बापू हर्डीकर, बर्वे तथा वामनराव चव्हाण, शंकर गांधी, शिरसाट बंधु इत्यादि १८ ते २५ वर्षे वयाची वरील तरुण मंडळी त्यांच्याकडे वारंवार जात असू. त्या प्रत्येकाला हिंदुसभेची काय काय कामे करावयास सांगावयाची त्याची नावनिशी टिपणी एका कागदावर त्यांनी केलेली असे. या पैकी कोणीही त्यांच्या घरी गेला म्हणजे तो कागद पाहून त्याला त्याचे काम लिहून देण्यात येत व ते झाले म्हणजे त्या कागदावरून खोडून टाकण्यात येत. लहान असो वा मोठे असो त्यांचे कोणतेही काम योजनाबद्ध नि पद्धतशीर असे. त्यांची ही पद्धत वरील पैकी आज यात हयात असलेल्या माझ्या सारख्या काही जणांनी उचललेली आहे.

याच काळांत महात्माजींसमवेत अस्पृश्यता-निवारण आणि शुद्धि यावर आणि डॉ. हेडगेवार यांच्याशी त्यांची हिंदु संघटनेबाबत महत्त्वपूर्ण चर्चा झाली.

हिंदु-समाज एकात्म आणि बलशाली व्हावा यासाठी सावरकरांनी किती मूलगामी स्वरूपाचा विचार केला होता आणि त्या विचाराला अनुसरून ते हाती घेताना त्यांनी किती निर्भीड वृत्ति दाखविली याची कल्पना येण्यासाठी सावरकरांच्या जीवनांतील 'रत्नागिरी-कालखंडा' चा अधिक अभ्यास होणे आवश्यक वाटते.

*

# रत्नागिरी वास्तव्यातील ठळक घटना

८-१-१९२४ :- रत्नागिरीत आगमन.
२३-१-१९२४ :- रत्नागिरी हिंदुसभेची स्थापना.
१-७-१९२४ :- रत्नागिरीत प्लेगची साथ सुरु झाल्याने सरकारी अनुज्ञेने नाशिकला प्रयाण.
२४-११-१९२४ :- रत्नागिरीस पुनरागमन पण प्लेगज्वरामुळे शिरगांव ता. रत्नागिरी येथे गमन
मार्च १९२५ :- सावरकर-हेडगेवार यांची भेट.
मार्च १९२५ :- मद्रासचे प्रसिद्ध क्रांतीकारक अचिकी तथा व्ही. व्ही. एस. अय्यर व सावरकर यांची भेट.
९-४-१९२५ :- शिरगाव मारुती मंदिरातील संमिश्र दिंडी व हिंदु एकता गीत.
एप्रिल १९२५ :- शिरगावातील पहिले संमिश्र हळदीकुंकू.
१० जून १९२५ :- शिरगावातून रत्नागिरीस स्थलांतर.
१९२५ :- रत्नागिरीत अस्पृश्यता निवारण, अस्पृश्यांना देवालय प्रवेश भाषा शुद्धी व लिपीशुद्धी आंदोलन.
मार्च १९२७ :- गांधीजी व सावरकर भेट.
ऑगस्ट १९२६ :- डॉ. आंबेडकर व सावरकर भेट.
डिसेंबर १९२९ :- जात्युच्छेद पहिले सहभोजन.
१९३० :- अखिलहिंदु गणेशोत्सव सुरुवात.
१९३१ :- श्री पतितपावन मंदिर स्थापना.
जून १९३१ :- वासुदेव बळवंत गोगटे व सावरकर भेट.
मे १९३४ :- अखिल हिंदु उपाहारगृह सुरुवात.
७ मे १९३४ :- धोबीतलाव गोळीबार प्रकरणी सावरकरांना अटक.
जानेवारी १९३५ :- सावरकर मेहेरबाबा भेट.
१७ जून १९३७ :- सावरकर स्वतंत्र होऊन रत्नागिरीहून प्रयाण.

# रत्नागिरीतील ग्रंथ संपदा

१) मेपाठी आंदोलन
२) हिंदुपद पादशाही
३) मोपल्यांचे बंड
४) भाषा शुद्धी
५) संगीत उःशाप
६) संगीत संन्यस्त खड्ग
७) लिपी शुद्धी
८) उत्तर क्रिया
९) माझी जन्मठेप
१०) किर्लोस्कर मासिकातील विज्ञाननिष्ठ निबंध